# अत्तराचे दिवे



( कथासंग्रह )

वि. वि. बोकील.
V. V. Bokil

प्रथमावृत्ति

१९४४

किंमत १॥ रुपया

प्रकाशक—
दत्तात्रेय रघुनाथ कोपर्डेकर
५२९ सदाशिव, पुणें २.



अभिनेत्री मीनाक्षी यांचें वेष्टनावरील छायाचित्र
प्रफुल्ल पिक्चर्स, कोल्हापूर, यांनीं
कृपापूर्वक दिलें आहे.





मुद्रक—
लक्ष्मण सखाराम केळकर
ज. स. लि. प्रेस, ३९४ सदाशिव, पुणें २.

# अत्तराचे दिवे !

दुपारचीं जेवणें घाईघाईनें उरकून, छत्र्या, बव्याला खाकोटीस मारून संध्याकाळीं ५॥ वाजतां मिळणाऱ्या राकेलसाठीं दुपारीं एक दीड वाजतां गृहलक्ष्मींनीं बारीमधें तिष्ठत उभे राहण्याचे ते दिवस होते. पाऊस नसला तर उन्हाचा ताप आणि ऊन नसलें तर पावसाची भीति. खांद्यावर एक मूल, ओचाला बिलगून उभें असलेलें दुसरें एक मूल; आणि रिकामी बाटली गदेप्रमाणें खांद्यावर टाकून हजारों प्रश्नांनीं डोकें भंडावून सोडणारें पुढें उभें असलेलें तिसरें मूल; त्यांत मागच्या बायकांनीं पुढें ढकलावें व पुढच्यांनी मागच्यांना व्याख्यान झोडावें.

—आणि तो कलकलाट!

मनांत येई कीं याच लोकांच्या आजापणजांनी हिंदुस्तानच्या या टोका-पासून त्या टोकापर्यंत आपला दरारा बसवण्यासाठीं एकेकाळीं तांडवनृत्य केलें होतें हें खरें तरी वाटेल काय? दोनचार पिढ्या गेल्यावर 'अनुवंशिक' म्हणून समजला जाणारा गुण अजिबात पुसला जावा हें शक्य आहे काय?

गोष्ट अप्रिय आहे पण सत्य आहे.

पुण्यांतील शनीच्या पारावरून मी चाललों होतो. वर वर्णिलेल्या एका बारीमधें ऐन दुपारच्या उन्हांत एक पांढरपेशा वर्गातील तरुणी आपल्या तीन कच्च्याबच्चांना घेऊन उभी होती. चारीहि जिवांचे चेहेरे घामानें डबरले होते व उन्हानें लाल पडले होते. दोन मुलें साधारण पांच वयो-मर्यादेपलीकडील दिसत होतीं. युगानुयुगें साडेपांच वाजण्याची वाट पाह-ण्याचा त्यांना कंटाळा आलेला दिसत होता. त्यांची सारखी कुरकूर चालली होती. कडेवरच्या मुलीला संभाळून ती माऊली त्यांचें कसेंबसें समाधान करीत होती. हा टांगा आला; तो टांगा आला—ही पंप आली ती आली! प्रत्येक खेपेस तिच्या मनांत धसका भरत असे—व तें वाहन दूर जाईपर्यंत ती त्या मुलांचें बोट घट्ट धरून ठेवीत असे—

शेवटीं ती शेजारच्या बाईला उद्देशून म्हणाली—"खरंच, काय मेला हा राकेलचा त्रास! त्यापेक्षां अत्तराचे दिवे जाळणं सोपं—"

—आणि एवढें बोलून ती खिन्न मुद्रेनें हसली !

नंतर बराच वेळ हें वाक्य माझ्या डोक्यांत घोळत होतें. बाई चटकन् बोलून गेली पण खरोखरीच कां अत्तराचे दिवे जाळणें सोपें आहे ? मग हें वाक्य तिच्या तोंडून बाहेर आलें कसें ? शिवाय ती बाई खिन्नपणानें कां होईना पण हसली होती. काय त्या हसण्याचा अर्थ ?

प्राप्त परिस्थिति कितीहि विकट असली तरी हसतमुख राहण्यांतच शहाणपणा आहे असें तर त्या हास्याला सुचवायचें नव्हतें ?

खरोखरीच मध्यंतरी मलाहि बरेच दिवस वाटूं लागलें होतें. देशामधें कसला डोंब उसळला आहे अन् आपण कथा कादंबऱ्या खरडीत बसलों आहोंत हें प्रशस्त आहे काय ? आणि उद्वेगाच्या भरांत मी ठरवून टाकलें कीं आतां यापुढें लढाई संपेपर्यंत तरी वाङ्मय बंद ठेवायचें.

जगाचें कांहींही नुकसान झालें नसतें, मी पुरतें जाणून आहे. परंतु त्या बाईचें उत्तर ऐकतांक्षणींच माझें मन बदललें. काय हरकत आहे ! संकटाच्या धसक्यानें हातपाय मोडून निष्क्रिय बसण्यांत काय स्वारस्य आहे ! संकट आलें आहे; इच्छा असो वा नसो ! त्याला तोंड देणें भागच आहे. मग हसऱ्या मुखानें तरी सामोरें कां जाऊं नये ?

मी लागलीच ठरवून टाकलें कीं या पुढील कथा संग्रहाचें नांव—

**अत्तराचे दिवे !**

१४-१-४१. — वि. वि. बोकील



सौ. लीला कुलकर्णी

यांस

सादर समर्पण

— वि. वि. बोकील

## श्री. बोकील यांचें वाङ्मय

### प्रकाशित

१ फोल आशा
२ वळवांचे पाऊस
३ गारांचा वर्षाव
४ दुसरी सावली
५ झंझावात
६ जलधारा
७ उल्कापात
८ बोकिलांच्या गोष्टी
९ मंगळागौरीच्या रात्रीं—
१० मांडवावरील वेली
११ झिमझिम
१२ बेबीचा भाऊ
१३ साडेतीन शहाणे
१४ बेबीची बहीण
१५ मीना--नीना
१६ तारांबळ
१७ चल पुढें
१८ अत्तराचे दिवे
१९ चिमखडे

### संकल्पित

१ बेबी ( पुनर्मुद्रण )
२ द्वंद्व ( कादंबरी )
३ ब्रह्मघोटाळा ( कादंबरी )
४ वसंत ( कथा )
५ सुंठ फुलली ( कथा )
६ गाडीवान् ( नाटक )
७ पिवळा बंगला ( कादंबरी )

## — प्रकाशित —

वि. वि. बोकील

जलधारा
मंगळागौरीच्या रात्रीं
मीना–नीना ( नाटक )
दुसरी सावली
बोकिलांच्या गोष्टी
अत्तराचे दिवे

साने गुरुजी

स्त्री–जीवन १ व २
क्रांति
राष्ट्रधर्म
समाजधर्म
तीन मुलें

य. गो. जोशी

पुनर्भेट भाग ६ वा

राजरत्न जोशी

स्त्रियांचे हक्क
अविवाहितांचे प्रश्न
अविवाहितांचें नंदनवन

द. रा. कानेगांवकर

मराठीचिये नगरीं भाग १ ला

पु. पां. गोखले

आगरकर ( चरित्र )

मा. भ. नंदुरकर

मानलेलीं मुलें

ग. ल. ठोकळ

कडू साखर

के. नारखेडे

काव्यकलेचें अंतरंग

पंडित सप्रे

अर्धचंद्र



## — आगामी —

ग. ल. ठोकळ

? ( कादंबरी )

ना. धों ताम्हनकर

माईची माया ( २ री आवृत्ति )

वि. वि. बोकील

पिवळा बंगला

द. रा. कानेगांवकर

मराठीचिये नगरीं भाग २ रा

प्रकाशक : द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २.

# विद्वान् वधू ! : : १

कान्तेशीं लग्नाचें ठरल्या दिवसापासून शिवराम अत्यंत खुषींत होता. मनाजोगती वधू निश्चित ठरल्यावर कोणता तरुण आनंदित होणार नाहीं? कांहीं जुनाट, बुरसटलेल्या विचारांचे लोक ह्या विधानाला कदाचित् आचरटपणाचा प्रकार म्हणून हंसतील. त्यांच्या दृष्टीनें विचार केला तर विवाह ही एक आयुष्यांतल्या अनेक स्थित्यंतरांपैकीं एक क्षुल्लक बाब होय. आजवर काय लग्नें झालींच नाहींत? आणि संसार झाल्याशिवाय जगांतील जनन संख्या काय आपोआप वाढली? त्यांच्या दृष्टीनें विवाह अमक्याच व्यक्तीशीं झाला पाहिजे असा आग्रह धरण्यांत शहाणपणा समजण्यांत येत नाहीं. वधू सांगून आली, आईवडिलांनीं पसंत केली. ठीक आहे. दोन हात, दोन पाय, नाकडोळे ठीक आहेत. यापलीकडे आणखी या गोष्टीला विशेष महत्त्व देण्याचें काय प्रयोजन? भटजीबुवांनीं आयत्या वेळीं पुढें केलेला दीड दमडीचा हार डोळे मिटून समोर उभ्या असलेल्या व्यक्तीच्या गळयांत टाकावा आणि त्यासंबंधीं पुन्हा विचारसुद्धां माणसानें करूं नये.

परंतु नवीन पिढी साधा टूथब्रश विकत घेतांना सुद्धां जिथें शॉर्ट हेड, अमुक कंपनी का तमुक कंपनी इतका आस्थेवाईकपणा दाखवते तेथें जन्माची सहचरी निवडतांना उगाच घिसाडघाई करील होय? कॉलेजमध्यें असतांना पोरींबरोबर चार घटका शिळोप्याच्या गप्पा मारणें, त्यांतील

एखादी गुलाबी, रसरशीत ओटांची इवलीशी पोरगी दिसलीच तर तिला सिनेमाला घेऊन जाणें, हॉटेलांत फॅमिली कंपार्टमेंटमध्यें चहा वगैरे पाजणें हे प्रकार चालायचेच. त्यांत विचारापेक्षां विकाराचीच जास्त दाट छटा असते. दोन घटका मनरंजन यापेक्षां कोणताहि तरुण असल्या त्रांगड्याकडे जास्त गंभीरपणानें पहात नाहीं. प्रयोगशाळेंत बरोबरीनें प्रयोग करण्याची पाळी आली तर आपल्या मदतीला घाऱ्या डोळ्यांची पोरगी आहे कां काळसर डोळ्यांची पोरगी आहे याचा कुणी फारसा विचार करीत नाहीं. साधारण चालसे दिसली तरी तासभर वेळ मारून नेतां येते. परंतु जन्मभर दिवसाचे चोवीस तास डोक्याशीं बसणारी मुलगी जर अगदींच 'काकू' वर्गांत मोडण्याजोगी असेल तर आयुष्य ढकलणें सोपी गोष्ट नाहीं.

शिवराम त्या दृष्टीनें मोठा भाग्यवान् होता लेकाचा! एखाद्याचें नशीब तरी पहा कसें त्याच्या मागे धावत असतें! कॉलेजच्या चार वर्षांच्या काळांत शिवराम पोरीबाळींत वाढत होता. खिशाला लटकणारें फाउंटनपेन एखादे वेळीं चुकून घरीं राहील परंतु शिवराम एखादी तरी नीटस पोरगी बरोबर घेतल्याशिवाय गांवाबाहेर फिरायला जायचा नाहीं. त्याची आई तर नेहमीं अभिमानानें बोलून दाखवी कीं, 'आमचा शिवराम माणसांतला आहे. त्याला नेहमीं कुणीना कुणी तरी बोलायला लागतं. त्याला भारी माणसं भोंवतीं गोळा करण्याचा नाद.' शिवरामच्या वडिलांनीं पत्नीचें हें अभिमानाचें भाषण अक्षरशः मान्य केलें परंतु आश्चर्य एवढेंच व्यक्त केलें कीं, माणसाचा लळा आहे हें ठीक पण माणसामाणसांत सुद्धां भेद आहे-तच. पैकीं स्त्रीवर्गाचाच फक्त त्याला एवढा लळा लागावा हें जरा विलक्षणच नाहीं कां!

शिवराम बी. ए. झाला. नंतर दोन वर्षांनीं एम्. ए. झाला. आतां यापुढें त्याला देतां येण्याजोगी कोणतीच परीक्षा न उरल्यामुळें तो वडिलांच्या देखरेखीखालीं कंत्राटी कामाचा व्यवसाय पाहूं लागला. येथेंहि कामाकडे त्याचें लक्ष यथातथाच दिसून आलें. मुंबईला एखाद्या पारशाला गटवून एखादें कंत्राटाचें काम आपल्या कंपनीला मिळविण्यासाठीं मोठ्या विश्वासानें वडिलांनीं त्याला पाठवावें आणि नंतर दोन दिवसांनीं कळून येई कीं, कंत्राटाचें काम दुसऱ्याच माणसाला मिळालें आणि शिवराम

आपल्या एका जुन्या दोस्तिणीच्या समवेत मुंबईत भटकत होता. तीन-चार वेळां वडिलांनीं गम खाल्ली. नंतर मात्र त्यांनीं निश्चय केला कीं, पोराला आतां असा एकटा मुंबईत हिंडूं देणें धोक्याचें आहे.

आपल्या एका स्नेह्याची मुलगी नुकतीच एम्. ए. झाल्याचें त्यांच्या कानावर आलें होतें. कान्तेला त्यांनीं आजवर फारशी पाहिली नव्हती. लहानपणीं परकरांत वावरणारी कान्ता त्यांना मोठेपणीं जेव्हां प्रत्यक्ष पाह्यला मिळाली तेव्हां त्यांना कमालीचा आनंद झाला. मुलगी दिसायला नक्षत्रासारखी होतीच. शिवाय शिवरामाला तिचें शिक्षण खात्रीनें आवडलें असतें. दोन्हीकडच्या मातापितरांनीं हें लग्न घडवून आणण्याचें ठरविलें. शिवरामला जेव्हां ही हकीगत कळली तेव्हां त्याला आश्चर्याचा धक्का बसला. आपले वडील जन्मभर कंत्राटी कामें उरकीत आले हें तो जाणून होता. वडिलांच्या सिमेंट, वाळू, खडी इत्यादि मिश्रणाच्या ज्ञानाविषयीं त्याला एकदम आदर होता. परंतु मुलाला सहचरी पाहून देतांनासुद्धां ते इतक्या तज्ज्ञपणानें परीक्षा करतील हें त्याला थक्क करून सोडणारें ज्ञान होतें. कांहींका असेना, वडिलांच्या पसंतीवर तो एकदम खूष होता. सुंदर विशेषतः शिकलेली पत्नी मिळायला भाग्य लागतें तें भाग्य शिवरामकडे नेंहमींच्या पद्धतीप्रमाणें चालत आलें होतें. लग्नाचे मुहूर्त अजून एकदोन महिन्यानें येणारे होते. तोंपर्यंत तो नित्यनियमानें या ना त्या निमित्तानें आपल्या प्रीतिदेवतेची मनोमन पूजा बांधण्यांत स्वतःला धन्य समजत होता. हें कान्तेचें कंत्राट त्याला नेहमींच्या कत्राटी कामापेक्षां कितीतरी गोड वाटत असे.

कान्ता सुंदर होती. परंतु पुष्कळ वेळां मौज अशी होते कीं, लोक आपल्यावर कां लुब्ध होत असतात याचें कारण त्या लुब्धविषयाला क्वचितच कळून येते. कान्तेला आपल्या सौंदर्याचा यत्किंचितही पत्ता नव्हता. आजवर पुष्कळ वेळां तिनें आरशांत स्वतःचा चेहरा निरखून पाहिला होता. तिची धाकटी बहीण प्रेमा तिला थट्टेनें म्हणेसुद्धां कीं 'पुरे झालं ताईसाहेब, आतां आरशांत रूप पाहणं. एखादे वेळीं आरशाची सुद्धां दृष्ट होईल अशानं.' कान्ता आश्चर्यानें तिच्याकडे पाहूं लागे. आपण जेव्हां जेव्हां आरशांत पाहतों तेव्हां तेव्हां लोकांना आपण आपलें रूप पहातों

असें कां वाटावें हें कोडें तिला उलगडलें नाहीं. प्रेमाला तिनें लाख वेळ. समजावून सांगण्याचा प्रयत्न केला होता. परंतु प्रेमा हसण्यावारी घालवीं

'माहिती आहे. उगाच सोंग घेऊन वेडगांवाला कशाला जातां, ताई-साहेब ! आरशांत मनुष्य पहातो तो काय आरशाची जाडी तपासून पहाण्या-साठीं होय ?'

'अग पण प्रेमा, मी खरोखरींच आतां माझ्या नाकावर हा कसला फोड आला आहे तें पाहात होतें.'

'तर—तर ! त्या फोडामुळें बाकीच्या रूपाची खुलावट कशी काय होते हें पहाण्याकरतांच तूं आरशांत पाहात होतीस. कबूल करूं नकोस तूं. काय मौज आहे पहा ! मी इतक्या वेळां आरशांत पाहातें पण माझं नकटं नाक कांहीं अजून सरळ होत नाहीं.' प्रेमा मोकळया मनानें हंसूं लागली.

'मूर्ख आहेस तूं. वरच्या सौंदर्याला इतकी किंमत देणं सुशिक्षितपणाचं लक्षण नाहीं.'

'पण मी सुशिक्षित आहेच कुठें ? मॅट्रिकला दोनदां बसलें अन् दोन्ही वेळेला आपटी खाल्ली. आणि मूर्ख तर आहेच म्हणा ? आईनं तर मला केव्हांच ठाण्याला पाठवली असती पण काका अजून माझ्यावर चिडले नाहींत म्हणून तरी मी या घरांत तुझ्या पाठोपाठ तुझ्या सांवली-सारखी वावरते आहे. खरंच ताई, तूं इतकी कशी ग सुंदर दिसतेस ! कोणतं क्रीम तूं रात्रीं झोपायच्या वेळीं तोंडाला लावतेस मला सांगून तरी ठेव !'

'छल्ल ! पुन्हा लागलीस कां वेड्यासारखी बरळायला ! प्रेमा, हें सुंदर दिसण्याचं वेड तूं सोडून द्यावंस असं मला वाटतं—शोभत नाहीं तुला हें.'

'आतां तूं तसं म्हणणारच ! तूं एक मासा गळाला अडकावून बसली आहेस, पण माझं अजून ठरायचं आहे. जगाच्या बाजारांत मला कोण विचारतो ? मॅट्रिकला दोनदां नापास होणारी विद्वान मुलगी मी ! बरं दिसण्यांत म्हणावं तर तिथेंही शुभं करोतीच—' प्रेमा हसत म्हणाली.

सख्ख्या बहिणी दोघी. पण दोघींत खरोखरीच पूर्व पश्चिमेइतकें अंतर होतें. प्रेमा बुद्धीनें यथातथाच होती. आणि सौंदर्याच्याही बाबतींत तिच्या वांट्याला फारशी कमाई आली नव्हती. वयस्थालीच काय परंतु प्रत्यक्ष

नलिनीबाईंनासुद्धां हा आपल्या दोन्ही मुलींतील विरोध जाणवल्यावांचून राहात नसे. नलिनीबाईची कान्ता लाडकी मुलगी होती. रूपानें लाखांत उठून दिसणारी आणि विद्येनें साऱ्या घराण्याचें नांव उजळ करणारी मुलगी पाहून कोणत्या मातेचें ऊर दाटून येणार नाहीं? प्रेमाविषयीं त्यांना विषाद वाटे. तिनें आपल्या थोरल्या बहिणीचा कित्ता डोळ्यांपुढें ठेवून निदान शिक्षणांत तरी प्रगति दाखवावी म्हणून त्यांनीं कांहीं थोडथोडकें प्रेमाला बोलायचें ठेवलें नव्हतें. आणि याच कारणामुळें प्रेमा थोडीशी कडवट विचाराची बनली होती. आपल्या थोरल्या बहिणीला लोकांनीं चांगलें म्हणावें यांत तिला आतां अभिमान वाटण्याजोगें कांहीं शिल्लक राहिलें नव्हतें. कान्तेला चांगलें म्हणणारी व्यक्ति आपल्याला तुलनेला घेऊन विचार करते हें तिला अनेक वेळां अनुभवानें पटलें होतें. त्यामुळेंच कीं काय बहीणीबहिणीमध्यें एक प्रकारचा दूरावा निर्माण झाला होता. अजून प्रेमा कोणाजवळ चिडून प्रतिकाराची भाषा बोलत नसे याचें एकच कारण म्हणजे जरी तिला साऱ्या जगानें दूर ढकललें होतें तरी तिच्या वडिलांनीं म्हणजे काकांनीं तिला अजून दूर केलें नव्हतें. उलट पोरीच्या मनावर वाईट परिणाम होऊं नये म्हणून ते तिला जास्त जवळ करूं पहात होते. प्रेमाला वडिलांची ही कारवाई ओळखतां आली नाहीं असें नाहीं, परंतु त्यांतहि तिला एक प्रकारची गोडी वाटत होती. कोणी नाहीं तरी निदान काका तर आपले आहेत या विचारानें ती मनाची कशीतरी समजावणूक करून घेत होती.

कान्ता एम्. ए. झाल्यावर नलिनीबाईंना अस्मान ठेंगणें झाल्यागत वाटलें यांत नवल काय? आपल्या मुलीचें त्यांनीं कौतुक करण्याचें मुळींच बाकी ठेविलें नाहीं. ज्याच्या त्याच्याजवळ त्या अभिमानानें एम्. ए. ची परीक्षा म्हणजे किती अवघड असते आणि कान्ता ती अवघड परीक्षा कशी हंसतखेळत पास झाली हें वर्णन सविस्तरपणें करून सांगूं लागल्या! शिवरामाच्या आईलासुद्धां त्यांनीं बजावलें कीं, धन्य समजा तुम्ही स्वतःला, असली सून कांहीं देवाजवळ नवस मागून सुद्धां मिळायची नाहीं. एम्. ए. परीक्षा पास झालेल्या सुना कांहीं झाडाला लागत नसतात. शिवरामची आई सुद्धां गप्प बसली. माऊलीच्या मनांत एक विचार नकळत चमकून

गेला कीं, माझाही मुलगा एम्. ए. झालेला आहे, त्याची काय वाट! अन् एम्. ए. झालेली सून म्हणजे रोज तिची आरती करायची कीं काय! परंतु उघडपणें असलें कांहीं बोलून दाखविण्याचें तिला धैर्य झालें नाहीं. मुलाच्या कल्याणाकरितां ती मुकाट बसली.

कान्तेचें खाजगी रीतिनें झालेलें कौतुक नलिनीबाईंच्या दृष्टीनें अपुरें होतें. चारचौघां लोकांत तिच्या मोठेपणाचें, विद्वत्तेचें प्रदर्शन व्हावें ह्याविषयीं त्यांचें मन हळहळूं लागलें. एखाद्या विद्वत्तापूर्ण विषयावर चार-चौघांत कान्तेनें दणदणीत व्याख्यान द्यावें म्हणजे आपल्या नांवानें खडे फोडणाऱ्या इतर बायका तोंड शिवल्याप्रमाणें गप्प बसतील हें सुखस्वप्न त्यांनीं कवटाळून धरलें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं एके दिवशीं पतिराजाजवळ गोष्ट काढली. परंतु काकांना या नसत्या लफड्यांत लक्ष घालायला वेळ होताच कुठें? त्यांनीं उडवाउडवी करायला सुरवात केली, तेव्हां नलिनीबाई खवळल्या.

'हें पहा! तुम्हाला कशाची मेली हौसच कशी नाहीं? देवाच्या दयेनं सोन्यासारखी पोरगी तुम्हाला मिळाली आहे—'

'कबूल! पण सोन्याच्या दोरीनं गळफांस घेतला म्हणजे जीव सुखानें जाईल का?' काका म्हणाले.

'तुम्हाला सगळ्याच गोष्टी चेष्टेच्या वाटतात, तें कांहीं नाहीं, कान्तेचं व्याख्यान झालं पाहिजे—' नलिनीबाई आवेशानं म्हणाल्या.

'झालं पाहिजे हें तूं म्हणतेस! पण माझ्या साहेबाला मराठी भाषेचं 'श्री'च्या लहान मुलं काय म्हणतात त्या रेघे इतकं सुद्धां ज्ञान नाहीं त्याला काय करणार?'

'इश्श! तुमच्या साहेबापुढें तिला व्याख्यान देऊन काय करायचं आहे? मी म्हणतें आहे कीं, आपल्या हॉलमध्यें सगळ्या बायकांना चहा-साठीं बोलवावं अन् त्यांच्या पुढें तिनं भाषण करावं. त्या पानशांच्या ताराबाईंचं मला चांगलं नाक ठेचायचं आहे. म्हणे मुलींना इतकं शिकवून काय नोकऱ्या करायला धाडायचं आहे! तसंच त्या आपट्यांच्या सुधा-बाईंनासुद्धां चांगलं दाखवणार आहे मी—'

'छान! म्हणजे कान्तेच्या भाषणाच्या बंदुकीनं तूं इतर बायकांना ठार

मारण्याचा बेत करते आहेस वाटतं. हें बघ तुला आवडणार नाहीं म्हणा. पण आपलं थोडसं खासगी सांगतों. मुलींच्याविषयीं अभिमान बाळगणं हें आई-वडिलांचं कर्तव्य आहेच म्हणा. पण मला वाटतें, जरा जपून असलेलं बरं. कान्ता एम्. ए झाली आहे. मला सुद्धां त्याबद्दल अभिमान वाटतो आहे. पण बायकांच्या बाबतींत नुसतं पुस्तकी ज्ञान हें त्यांच्या अंतःकरणाचं गमक ठरत नाहीं. ज्ञानवंत झाल्यावर ती इतरांशीं कशी वागते यावर तिच्या ज्ञानाची खरी कसोटी अवलंबून आहे.'

'मग मी काय म्हणतें तर ! तुम्हांला कौतुक कसं तें नाहींच. मी कांहींही म्हटलं अन् तुम्ही माझा मनोभंग केला नाहींत असं आजवर कधीं झालंय कां ?'

'नवऱ्याच्या वांट्याला शेवटीं हाच आहेर उरतो म्हणा ! पण मी तुला अजून सांगतों कीं, तूं हें व्याख्यानाचं खूळ सोडून दे. त्यापेक्षां एकदोन महिन्यांनीं त्या पोरीचं शिवरामशीं लग्न ठरलं आहे. तेव्हां संसारांतल्या चार गोष्टी शिकवल्यास तर बरं होईल असं मला वाटत आहे.'

'म्हणजे एम्. ए. झालेल्या मुलीला आतां शेणगोळा लावायला सांगूं होय ? चांगलं आहे. मी जर कांतेसारखी शिकलेली असतें तर तुम्हीं माझी हीच रया करून सोडली असती काय ? बरं झालं बाई नाहीं मी शिकलें म्हणून ?' पतिराजांकडे कुत्सितपणानें पहात नलिनीबाई म्हणाल्या.

'खरंच बरं झालं तूं शिकली नाहींस म्हणून ! नाहींतर आपला हा योग जुळून आलाच नसता.' काका तोडीस तोड उद्गारले.

'शोभतं कां असं बोलणं तुम्हाला ? शिवराम तुमच्यासारखा नाहीं म्हणून बरें बाई ! नाहींतर माझ्या पोरीचे धिंडवडे निघाले असते. शिवराम मात्र खरोखरीच माझा जावई शोभून दिसेल. कान्तेशीं किती आदरानं तो बोलतो पाहिलंत कां ?' नलिनीबाई प्रसन्न मुद्रेनें अर्धवट स्वतशींच म्हणाल्या.

'तेंच लक्षण मला ठीक दिसत नाहीं. पत्नीशीं आदरानं बोलायला पतीनं सुरवात केली, कीं संसार संपलाच म्हणून समजावं. अग रोज उठून मी तुझ्याकडे एकाद्या भाकरीच्या तुकड्यानें तृप्त झालेल्या कुत्र्यासारखा वांकडी मान करून पाहूं लागलों तर तें तुला तरी आवडेल का ?'

'तुम्हाला दुसऱ्याला नांवं ठेवायची खोडच आहे. शिवराम आणि

कान्ता यांचा जोडा देवानंच जमविल्यासारखा मला तरी निदान दिसतो तुम्ही कांहींही म्हणा मग! बरं पण येत्या रविवारीं मी आमच्या वनित समाजांतील बायकांना बोलावूं नं! आम्हाला हॉल मिळाला पाहिजे म्हणून विचारतें.'

'रविवारीं? इतर कोणत्या वारीं जमलं तर पहानं! म्हणजे असं क आठवड्यांतून रविवार एकदांच येतो अन् त्या दिवशीं घराची आफ्रिक झालेली पाहण्याचं म्हणजे—बरं बुवा राह्यलं तुमच्या मनाप्रमाणें होऊं द्या त्या दिवशीं आमचा दुपारचा चहा प्रेमाबरोबर तिसऱ्या मजल्यावर धाडून द्यायला विसरूं नका एवढी तरी भीक घाला आम्हाला!' काका हसत हसत तेथून निघून गेले. आणि नलिनीबाई वनिता समाजांतील धेंडांचा विचार करूं लागल्या.

नलिनीबाई वनिता समाजांतील अनेक निष्क्रिय कार्यकर्त्यांपैकीं एक होत्या हा वनिता समाज म्हणजे एक जबरदस्त संस्था होती. पूर्वीं कधींकाळीं चार घटका घरापासून दूर राहण्यास मिळावें म्हणून पुरुषांनीं क्लब काढले होते म्हणतात त्याप्रमाणें हल्लीं आपल्या पांढरपेशा समाजांतील निरुद्योगी महिलांनी ही एकवटून काढलेली संस्था दिसते. उभ्या मुंबईत हल्लीं हे समाज प्रत्येक गल्लींत दोन तीन तरी सहज सांपडतील. समाज स्थापन करण्यांत सद् त्यांचा हेतू अतिशय उच्च असतो. महिलांची सर्वांगिण उन्नति हाच तो हेतू होय. कोणीसें म्हटलें आहे कीं, ध्येय प्रत्यक्ष गांठण्यापेक्षां तें गांठण्याची धडपड करण्यांतच सगळी मौज असते. वनिता समाज स्थापून महिलांनीं या विधानाला बळकटी आणली आहे. बहुतेक महिला समाज इथून तिथून सारखेच असतात. प्रत्येकीच्या वरीं पेन्शन म्हणा किंवा लठ्ठ पगार म्हणा म्हणजे पैशाची फिकीर नसते. बायकांच्या स्थूल देहाला कंटाळून म्हणा किंवा अन्य कांहीं कारणानें पतिराज शक्यतोंवर संसारांतून लक्ष काढण्याच्या उद्योगांत सारखे गढून गेलेले असतात. अतिसहवासानें घराला कंटाळलेल्या महिला घराबाहेर चार घटका एकत्र जमून कांहीं तरी कार्य करून दाखवण्याच्या उद्देशानें एके ठिकाणीं जमतात. आणि एकाद्या नवीन महिला समाजाची स्थापना जाहीर करण्यांत येते.

नलिनीबाईंचा वनिता समाज वरील विधानांना अपवाद नव्हता.

समाजांतील प्रत्येक स्त्री नेहमीं कोणत्या तरी निरुपद्रवी देशसेवेच्या फिकीरींत पडलेली आढळते. सावरकरांच्या उत्सवांचा फंड संपला. सुदैवानें विजापुरांत दुष्काळ पडला म्हणून त्या फंडानें महिलांना कार्य मिळवून देण्याचें यश संपादन केलें. बंगाल फंडानें तर त्या महिलांना जन्मभर पुरेल एवढें कार्य वाटून दिल्यामुळें समाजांतील प्रत्येक स्त्री आतां निर्घोर होती. उद्यां फंड मागण्याचें कार्य एकदम बंद पडलें तर समाजावर ती मोठी दुर्धर आपत्ती ओढवणार होती ! सुदैवानें तसली आपत्ती ओढवण्याची परिस्थिति आपल्या देशांत नाहीं. आपला देश त्या दृष्टीनें विचित्रपणांत बहुरत्ना वसुंधरेला हार जाणार नाहीं. दरवर्षी कोणत्या ना कोणत्या तरी विभागांत दुष्काळ हा पडायचाच अन् त्यानिमित्त फंडाचें काम हें निघायचेंच. कांहीं नाहीं तर निदान पुढाऱ्यांच्या एकसष्ट्या हें निमित्त तर कुठें गेलें नाहीं !

असल्या प्रकारच्या व्यक्तींनीं बनलेल्या स्त्री श्रोतृसमाजापुढें कान्तेचें व्याख्यान ठरलें होतें. व्याख्यान देणार कान्ता. पण नलिनीबाईच्या जिवाची कोण धांदल! हिला बोलावणं गेलं कां, तमकी केव्हां गांवाहून येणार आहे, अमकीला दुसऱ्यांदा बोलावणं गेलं पाहिजे, तमकीला वेळेवर कोणत्या ठिकाणाहून धरून आणलं पाहिजे—हजार भानगडी उरकतां उरकतां त्यांचा जीव मट्टयास आला ! परंतु कंटाळा कसला तो बाईला शिवलादेखील नाहीं. दिवाणखाना सजवतां सजवतां त्यांनीं रात्रच्या रात्र आदल्या दिवशीं जागून काढली. कशांत कमतरता पडतां कामा नये. पोरीचें पहिलें व्याख्यान पण असें दणकेबाज झालें पाहिजे कीं आपट्यांच्या सुधाबाईनीं खालींच मान घातली पाहिजे. पानशांच्या ताराबाईनीं तर !—

बिचारी कान्ता ! आईच्या आग्रहाखातर व्याख्यान द्यायला तयार झाली. परंतु व्याख्यानाला विषय कोणता घ्यावा हेंच तिला प्रथम उमगेना ! अनेक विषय तिनें मनांत आणून पाहिले परंतु त्यांतील एकही तिच्या मनांत भरेना. दर खेपेला उठल्यासुटल्या 'आजची स्त्री' 'उद्यांची माता' इत्यादी विषय पुन्हा पुन्हा उगाळणें तिला प्रशस्त वाटेना. प्रेमानें तिला एक व्याख्यानाचा विषय चेष्टेनें सुचवला.

'ताई तूं माझी मूर्ख बहीण' या विषयावर बोल. बघ टाळ्यावर टाळ्या पडतील.'

'गप्प बैस ग! चावटपणा करूं नकोस. अन् हें बघ, जेव्हां तेव्हां आपला मूर्खपणा दुसऱ्याला पटवून देत जाऊं नकोस' कान्ता चिडून म्हणाली.

शेवटीं शिवरामाच्या साहाय्यानें तिनें एक विषय मुक्रर केला. विषय अजिबात नवीन होता. 'कला आणि वास्तववाद' ह्या विषयावर बोलण्याचें तिनें कायम केलें. प्रश्न एवढाच होता कीं श्रोतृसमाजाला हा विषय कितपत समजेल? प्रेमा जवळच उभी होती.

'नाहीं तरी समाजांतील बायका जसं कांहीं तुझं व्याख्यान ऐकायलाच येणार आहेत कीं नाहीं? कुणाचा किती फंड जमला, कुणाची मुलगी कुणा-बरोबर पळून गेली, कोणती नटी जास्त फाजील आहे, असल्या सहज विषयावर एकमेकींचीं मतें ताडून पाहायला जमलेल्या बायकांना तुझ्या विषयाकडे लक्ष द्यायला फुरसत तरी मिळेल का?' प्रेमाचें हें धीटपणाचें बोलणें ऐकून शिवरामही थोडासा बुचकळ्यांत पडला. कारण तसें म्हणावें तर प्रेमाच्या म्हणण्यांत चूक कोणती होती? परंतु कान्तेचा असा हिरमोड करणें त्याला बरें दिसलें नाहीं.

'प्रेमा, तूं आतां गप्प बसायला काय घेशील?' शिवराम लटक्या रागानें तिच्याकडे पाहून म्हणाला!

'तुम्ही? तुम्ही मला आतां काय देणार आहांत? तुमच्या दातृत्त्वाचा हक्कदार तर तुमच्या पुढेंच बसला आहे. अगबाई, ताईला राग आला वाटतं. मी पळत जाऊन काकांच्या आड दडूनच बसतें कशी!' अल्लड-पणानें धांवत प्रेमा तेथून निघून गेली. कां कुणास ठाऊक शिवराम ती गेल्यावर बराच वेळ तिच्या मार्गाकडे पाहात विचारमग्न झाल्यासारखा दिसला! त्यानें स्वतःला जागें केलें! कान्तेचें व्याख्यान हा विषय महत्त्वाचा होता.

—कान्तेनें आपलें व्याख्यान लिहून काढलें. व्याख्यान लिहून काढ-ण्याची सावधगिरी तिच्याच मनाची होती. एकंदर बेत तिचा असा होता. व्याख्यान लिहून काढावयाचें. तें पाठ करावयाचें. व एक अक्षर न चुकतां घडाघड म्हणून दाखवायचें. आयत्या वेळीं सुचेल तें बोलण्याची तिच्या मनाची तयारी नव्हती. शिवरामजवळ तिने आपला बेत सांगितला आणि जेव्हां त्यानें पडद्यामागें उभा राहून तिला अडेल त्या ठिकाणीं पुढील वाक्य वाचून दाखवावें असें जाहीर केलें तेव्हां शिवराम चांगलाच गडबडला!

'पण कान्ता मला वाटतं यांत कांहीं तरी तुझं चुकतं आहे. म्हणजे असं पहा—व्याख्यान देण्याची ही तुझ्या आईची कल्पना मुळांत आपल्याला पसंत नाहीं. बरं, व्याख्यान देणार तूं. विषयाची सूचना मी केली. त्याची मांडणी मलाच विचारून केलीस. आतां मी म्हणतो हें लिहिलेलं बाड तूंच स्वतः वाचून दाखवीनास. आणि खरं सांगायचं तर बायकांत असं अडून उभा राहिला आपल्याला तितकस प्रशस्त वाटणार नाहीं.' शिवराम मनापासून म्हणाला. परंतु कान्तेनें त्याच्या या स्पष्टोक्तीचा जाणून-बुजून विपर्यास करण्याचा जणु काय विडाच उचलला. आजपर्यंत कधीं नाहीं तीं मुक्ताफळें तिनें त्याला बहाल केलीं– म्हणजे तुम्हीही आमच्या 'काकासारखेच दिसतां. तुम्हांला मला लोकांनीं चांगलं म्हटलेलं आवडायचं नाहीं. बरोबर आहे. तुम्ही पुरुष नाहीं का? बायकांनीं तुमच्यावर ताण केली तर विद्वत्तेची आजवरची तुमची मिरासदारी धुळीला मिळेल नाहीं का? आणि सांगून ठेवतें कीं, जर आपला संसार हा असाच अटीतटीचा सामना होणार असेल तर आपला विवाह न झालेलाच चांगला—' इतकें बोलून कान्ता रागानें त्याच्याकडे न पाहतां निघून गेली.

स्त्रियांच्या अंगचे गुण किंवा दुर्गुण हे असे अचानक बाहेर पडतात. त्यांच्या गोंधळलेल्या मनस्थितींत त्यांना शहाण्यानें कांहीं सूचना करून पाहव्यात म्हणजे स्त्रीजातीचे खरे गुण ताबडतोब बाहेर पडतात. अडचणींत सांपडलेली स्त्री अत्यंत हल्लक विचाराची होऊन बसते. शिवरामला आज कान्तेनें आपल्या स्वभावाची खरीखुरी बाजू संभावितपणें उघड करून दाखवली होती. तो या वेळपर्यंत कांता परत येईल या समजुतीनें दाराकडे टक लावून पहात होता परंतु कान्तेच्या ऐवजीं प्रेमा धांवत आलेली त्यानें पाहिली. प्रेमा हंसत आंत आली.

'भांडलांत वाटतं आमच्या ताईशीं? आणि इतक्या लवकर भांडणाला सुरवातहि झाली का?' प्रेमा शिवरामाला उद्देशून म्हणाली.

'मी? मी कशाला भांडेन? प्रेमा, खरं सांग, तुझी ताई खरंच रागावली आहे कां?' शिवराम चिंतातुर मुद्रेनें म्हणाला.

'आईपाशीं ती कांहींतरी तणतणत बोलत होती तें मला ऐकूं आलं म्हणून म्हटलं. पण तुम्ही असे बावरल्यासारखे कां दिसतां? ताईच्या

रागाला भ्यालास की काय? एक सूचना देऊन ठेवतें. वाटल्यास पत्करा. ताईच्या रागाला फारशी भीक घालीत जाऊं नका. ताई खरोखरच रागावली म्हणजे प्रथम आरडाओरड करते, नंतर रडूं लागते, नंतर अबोला धरते आणि दहापांच मिनिटांत पुन्हा पाळलेल्या मांजरीसारखी म्यांव म्यांव करूं लागते–' प्रेमा म्हणाली. शिवराम हे अनुभवाचे तात्विक बोल आश्चर्यचकित मुद्रेनें ऐकून घेत होता. त्याचें सारें लक्ष प्रेमाच्या नाकाकडे लागलेलें दिसत होतें. तिच्या नकट्या नाकाची निंदा त्यानें इतरांच्या तोंडून पुष्कळ वेळां ऐकली होती परंतु त्याला आतां प्रेमाचें नकटें नाक तितकेंसे निंदास्पद वाटत नव्हते. त्यांत नांवें ठेवण्याजोगें काय असतें? एखाद्याचें नाक सरळ असतें, एखाद्याचें थोडेसें वाकडे असतें. त्यांत त्या व्यक्तीचा काय गुन्हा? आपल्या हातांत थोडेंच आहे?

——शेवटीं प्रेमानें म्हटल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं त्यांची दिलसफाई घडून आली. या एकाच प्रसंगानें शिवरामनें धडा घेतला कीं, कान्तेला विरोधाचें वारें यत्किंचित मानवणारें नव्हतें. तिला विरोध करण्यापेक्षां तिच्या कलानेंच घेणें उत्तम हें त्यानें ठरवून टाकलें. नलिनीबाईंनीं हा समेट घडवून आणला आणि शिवरामनें आपल्या भावी पत्नीला तिच्या उत्कर्षाच्या मार्गांत मदत करणें हें त्याचें कर्तव्य ठरत असल्याचें त्यांनीं बोलूनही दाखवलें. भाषण करावयाचें त्याची प्रत शिवरामनें स्वतः गॅलरींत उभा राहून वाचावयाची व कान्ता अडेल त्या ठिकाणीं तिला मदत करायची असें त्रिवर्गांत ठरलें. शिवरामनें मोठ्या कष्टानें आपला रुकार दिला. स्वतःशींच तो विचार करीत होता कीं, पुढें लग्न झाल्यावर प्रत्येक बाबतींत उपस्थित होणारा विरोध हा असाच सासूबाईच्या मध्यस्थीनें काढून टाकावयाचा म्हटलें तर तें शक्य आहे का? कान्ता आज पहिल्यानें व्याख्यान देणार होती. उद्यां तिला हें व्याख्यानाचें व्यसन जडलें तर दर खेपेला हा धिंगाणा आपण सहन करावयाचा कीं काय? आणि आपल्या घरांत आपल्या आईला हें कितपत आवडेल! विचार करतां करतां नकट्या नाकाच्या प्रेमाची मूर्ति त्याच्या डोळ्यांपुढें उभी राहिली! परंतु तो विचार त्यानें गडबडीनें डोक्यांतून काढून टाकला.

व्याख्यानाचा दिवस येऊन ठेपला. हॉलमध्यें बायकांनीं बसावयाचें व

शिवरामनें गॅलरींत त्यांनां न दिसेल अशां बेतानें उभे राह्यचें ठरलें. तो आंतल्या बायकांना न दिसावा म्हणून एक चिटाचा पडदा गॅलरीच्या [illegible] लावण्यांत आला. काका ह्या साऱ्या चतुराईकडे पाहून गालांतल्या गालांत [illegible] एक अक्षरसुद्धां तोंडावाटे काढीत नव्हते. व्याख्यानाची कान्तेनें जंगी तयारी केली होती. भाषण जवळजवळ मुखोद्गत झालें होतें. बहुतेक शिवरामची मदत तिला लागणार नसल्याचें तिनें आईजवळ अभिमानानें बोलूनहि दाखवलें. परंतु ऐनवेळीं घोटाळा नको म्हणून तिनें शिवरामला गॅलरींतल्या वधस्तंभापाशीं नेऊन उभा केला; हळुहळू एक एक महिला सदस्य आपापसांत गप्पागोष्टी करीत हॉलमध्यें जमूं लागल्या. बायका जमण्यास सुरवात होतांच काका शिवरामला आशीर्वाद देऊन तिसऱ्या मजल्यावर पूर्वसंकेतानुसार निघून गेले. प्रेमाही त्याच्या पाठोपाठ वर पळणार होती परंतु शिवरामनें तिला बसवून घेतलें म्हणून ती अजून तथेंच रेंगाळत होती.

कान्ता मागच्या माडींत आपलें भाषण पुन्हा एकदां स्वतःशींच पाठ म्हणून पहात होती. बहुतेक सर्व भाषण पाठ झालें होतें. फक्त दोनच्च ठिकाणीं घोटाळा उडण्याचा संभव होता. तेवढ्यापुरतें शिवरामनें काम बजावलें म्हणजे ती विजयी ठरणार होती. नलिनीबाईंना तर आजचा दिवस म्हणजे कसोटीचा दिवस वाटत होता. मुलीच्या यशावर आज त्यांचें वनिता समाजांतील वजन टिकून राहणार होतें. मुलीनें आज सर्वांना थक्क करून सोडलें तर समाजांतील नाकानें वांगीं सोलणाऱ्या साऱ्या बायकांची त्या पुरेपूर जिरवणार होत्या! आज मुलीनें ही शिकार साधायला मात्र पाहिजे! म्हणजे मग घेतें एकेकींचा समाचार!

थोड्याच वेळांत संबंध हॉल भरून गेला. आजच्या व्याख्यानाचें महत्त्व नलिनीबाईंना व कान्तेला होतें त्याचप्रमाणें समाजांतील इतर बायकांना होतें. कांहींजणीना एम्. ए. झालेली मुलगी पावडर कशी लावते हें पाहण्याचें अगत्य होतें. कांहीं हितशत्रूंना नलिनीबाईंची फजिती उडवायला कुठें कांहीं सांपडतें कां हें पाहावयाचें होतें—आणि कांहींजणींना व्याख्यानानंतर येणाऱ्या खाद्यपेयावर सडकून ताव मारावयाचा होता, अशा अनेक कारणामुळें आज समाजांतील झाडून सर्व बायका जातीनें हजर होत्या.

बराच वेळ सभ्य शब्दांत एकमेकांच्या उखाळयापाखाळ्या काढण्याचें सत्कार्य उरकण्यांत आलें. सर्वजणीं जमल्याचें अजमावून पाहिल्यावर नलिनीबाईंनी सभेच्या कामास सुरवात होत असल्याचें जाहीर केलें. एकदोन तान्ह्या मुलांनीं उच्चैःस्वरात आपली नापसंती व्यक्त करण्यास प्रारंभ केला. 'पानसेबाई, आजच्या सभेला किशोरला नसता आणलांत तर चाललं असतं–' नलिनीबाई गंभीर मुद्रा करून म्हणाल्या.

'म्हणणं सोपं आहे. पण सगळयांच्याच वाट्याला कुठें असे हौयबा नवरे येत असतात–' पानसेबाई शेजारच्या एका बाईला उद्देशून पुटपुटल्या.

––सभेच्या कामास लवकरच सुरवात झाली नलिनीबाईंनी कापऱ्या हातानें कांतेला धरून हॉलमध्यें नेलें. जातांना शिवरामाच्या बाजूनें त्यांनीं साभिप्राय पाहून ठेवलें. कान्तेनें दिलेले भाषणाचे कागद पानाच्या संख्या-नुक्रमानें लावण्यांत शिवराम गढून गेला होता. प्रेमा त्याला ते कागद लावण्यास मदत करीत त्याच्याजवळ उभी होती.

कान्ता हॉलमध्यें गेल्याबरोबर जिकडे तिकडे सामसूम झालें. कांतेची चालण्याची ढब होतीच तशी आकर्षक. इतका वेळ कोपऱ्यांत खिदळणाऱ्या चार साळुंक्या मोठ्या कौतुकानें माना वर करून कान्तेकडे अनिमिष नेत्रांनीं पाहूं लागल्या. साऱ्या सभाजनांचे डोळे आपणाकडे लागल्याची जाणीव होतांच कांता प्रथम बुजाल्यासारखी झाली. येथें जमलेल्या कोण-त्याहि ढमाल्याबाईपेक्षां आपण जास्त शिकलेल्या आहोंत याची जरी तिला आठवण होती तरी जमावापुढें व्याख्याती म्हणून येण्याची ही तिची पहि-लीच पाळी होती. परीक्षेंत पास व्हायला सभाधीटपणाची गरज मुळीच लागत नाहीं. परंतु आतां मात्र त्याच गुणाची सर्वांत जास्त गरज होती. आपण काय बोलणार आहोंत तें कुणालाहि एक अक्षर कळणार नव्हतें हें ती जाणून होती. परंतु तेंच बोलतांना आपण जर कां अडखळलों तर मात्र तोंड काढा-यला जागा उरणार नाहीं या विचारानें तिला एकदम गुदमरल्यासारखें झालें. व्यासपीठावर ती जाऊन बसली ती धडधडणाऱ्या हृदयानेंच. कांहीं केल्या तिच्या छातींतील धुगधुग कांहीं कमी होण्याची चिन्हें दिसेनात. शिवराम ज्या खिडकीशी उभा असल्याचें तिला माहीत होतें त्या दिशेकडे तिनें मोठ्या केंविलवाण्या मुद्रेनें पाहून घेतलें.

आईच्या एका मैत्रिणीनें छोटेसें प्रस्तावादाखल कांहींतरी बोलल्याचें तिला दिसत होतें. मात्र त्या भाषणांतील एक शब्दही तिला समजला नाहीं. तिचें सारें लक्ष आपल्या भाषणाकडे लागलेलें होतें. मधून मधून नलिनी-बाई तिच्याकडे हंसून पाहिल्यासारखें करीत हें पाहून तर ती जास्त बावर-ल्यासारखी झाली. एकापरीनें आईचा तिला रागच आला. तिला एकदम लहानपणाची आठवण झाली. केव्हांतरी आपल्याला आई एरंडेल बशींतल्या चहांत घालून देत असे त्यावेळी आपण तो तवंग असलेला चहा मन घट्ट करून पीत असतांना आपली आई याच नेत्रांनीं आपल्याकडे पाहात अस-ल्याची आठवण तिला झाली. आणि तिला एकाएकीं आईचा अतोनात राग आला. इतकें साधें भाषण मला करतां येणार नाहीं अशी हिची समजूत आहे कीं काय ? थांब, दाखवतेंच ! विचारासरशीं कान्तेनें आपला खालचा ओंठ दातानें घट्ट दाबला.

कान्तेची पाळी आली, त्यासरशीं ती एखाद्या कळसुत्री बाहुल्याप्रमाणें व्यासपीठावर उभी राहिली ! सर्वांचे डोळे तिच्याकडे लागलेले दिसत होते. नाकावर पुन्हा पुन्हा येऊन बसणारी माशी तिनें हातानें दूर झटकली आणि अत्यंत गंभीर पणेंसुरवात केली, ' मद्भगिनींनो–, ' —आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, एका पाठीमागून एक वाक्य सारखें चालूं होतें.

–बाहेरच्या बाजूस शिवरामनें तिसरें पान नुकतेच उघडलें होतें. कान्तेची ही पाठ करण्याची विलक्षण शक्ति पाहून तोहि आश्चर्यचकित झाला होता.

' झालं. आतां पुढचे आठ दिवस आमच्या घरांत ताईची स्तुति अन् माझी निंदा– ! ' प्रेमा हलकेच त्याच्या कानाशीं लागून म्हणाली.

' कां ? बहिणीचा मत्सर वाटूं लागला वाटतं ? ' शिवरामनें हंसत हंसत चवथें पान उलटलें.

' मत्सर वाटायला माणसांत कांहीं साम्य तरी असावं लागतं म्हटलं. कान्ताची विद्वत्ता सूर्यासारखी प्रभावी आहे असं तिचे एक प्रोफेसर म्हणाले होते. खरंच, शिवराम, आमची कान्ता तुम्हाला मनापासून आवडते की नाहीं ? खरं सांगा हं ! ' प्रेमा त्याच्या हातांतील भाषणाचे कागद स्वतःच्या हातांत घेत म्हणाली.

शिवरामानें थोडा वेळ विचार केला. नंतर तो हंसून म्हणाला, ' वेड्या सारखा नाहीं का हा तुझा प्रश्न ? अग, आमचं लग्न एक महिन्यानं होणार आहे. '

' तुम्ही माझ्या प्रश्नाला हें सरळ उत्तर देत नाहीं. मी जर पुरुष असतें तर ताईशीं माझंच लग्न व्हावं म्हणून तपश्चर्यासुद्धां केली असती. ' प्रेमा मनापासून बोलत होती.

शिवरामला तिचा या वेळेचा अभिनिवेश खरोखरीच आवडला. एका-एकी तो मध्येंच तिच्या डोळ्याकडे पाहून म्हणाला, ' प्रेमा, रागवूं नकोस हं. पण तूं आतां कान्तेला सूर्य म्हणून म्हणालीस नं—तर मी तुला चंद्रकोर म्हणेन. अगदीं अष्टमीची. '

प्रेमानें चटकन आपले डोळे जमिनीकडे लावले. थोड्या वेळानें वर मान करून ती म्हणाली—' कांहीं तरीच. साऱ्या जगाला माझं ध्यान पाहून शिसारी आली आहे अन् तुम्ही माझी स्तुति करीत आहांत ! जसं कांहीं खरंच वाटेल मला कीं नाहीं. '

आतां मात्र शिवराम स्वतःला पूर्णपणें विसरला. आपण काय करतों आहोंत याचें त्याला भान राहिलें नाहीं. त्यानें आवेगानें प्रेमाचे दोन्ही हात चटकन् पकडले. ' प्रेमा ' आत्तांच्या आत्तां काकाच्याकडे वर जाऊं या. मला त्यांना कांहीं तरी महत्त्वाचं सांगायचं आहे. माणसांनीं चूक करण्यापूर्वी जागं झालेलं बरं. '

प्रेमानें आपले हात बळे बळे सोडवून घेतले. शिवरामनें पुन्हा तिचे हात धरले.

—आंतल्या बाजूस कान्ताचें भाषण खणखणित सुरांत चाललें होतें.

' म्हणूनच मला वाटतें कीं, कलाकृतीकडे पाहतांना सत्य, वास्तवता व व स्वाभाविकता यांचा विचार करणें गौण आहे. कलाकृतीपासून आनंद, मनोरंजन, समाधान हीं कितपत मिळतात हें प्रथम पाहिलें पाहिजे. नंतर सत्य व स्वाभाविकता यांचा विचार करावा. जर कलाकृतीचा पाया—'

—आणि कान्ता अडली. पुढचे शब्द तिला प्रयत्न करूनहि आठवेनासे झाले. अगदीं याच ठिकाणीं आपण अडणार याची तिला खात्री होती म्हणूनच तिनें मघांशीं बाहेर येतांना हा परिच्छेद पुन्हां पुन्हां पाहून ठेवला होता.

परंतु शेवटीं दैवानें डाव साधला होता. भाषण आठवण्याच्या अनेक युक्त्या तिनें योजून पाहिल्या परंतु पुढचे शब्द जे विस्मृतींत गेले ते कायमचे. मोठ्या आशेनें तिनें मागच्या बाजूनें कान टवकारले. मधेंच एकदां ती चक्क मागें वळलीसुद्धां. परंतु शिवराम त्यावेळीं जाग्यावर होतांच कुठें ?

पहिल्या एकदोन सेकंदांत सभा फारशी बिथरलेली दिसत नव्हती. परंतु पाव मिनीट, पाऊण मिनीट व शेवटीं एक मिनीट होऊनहि जेव्हां कान्ता पुढें बोलेचना तेव्हां एकजण सर्वांना ऐकू जाईल अशा बेतानें पुटपुटली; ‘ पाठ केलेलं विसरलं मेलं– ’

—आणि सभेंत हंशाचा व टाळ्यांचा एकच कल्लोळ माजला ! नलिनीबाईंनीं प्रसंगावधान राखून कान्तेला हाताला धरून आंत नेलें. मायलेकींच्या साऱ्या सुखस्वप्नांचा चक्काचूर झाला होता. आणि ज्याच्या मूर्खपणामुळें हा प्रसंग ओढवला होता त्याचें कंबरडें मोडून टाकण्याच्या आवेशानें गॅलरींत मायलेकींनी डोकावून पाहिलें. परंतु गॅलरींत कान्तेच्या व्याख्यानाचे कागद जमिनीवर लोळत पडलेले फक्त त्यांना दिसले. शिवराम गेला तरी कुठें ? नलिनीबाईंच्या अंगाचा संतापानें तिळपापड उडून गेला. अशा बेभरवशाच्या माणसाला आपण आपली मुलगी विश्वासानें देणार होतों. त्याच क्षणीं त्यांच्या मनानें घेतलें की, काय वाटेल तें होवो कान्तेला त्या माकडाच्या गळयांत बांधायची नाहीं. आंतल्या बाजूस गेल्यावर कान्ता एका कोचावर धाडकन् पडली. आणि फजितीच्या प्रसंगाची आठवण होऊन ती रडूं लागली. त्याचक्षणीं तिनें मनाशीं निश्चय केला कीं, शिवरामचें तोंडसुद्धां पुन्हा पाहूं नये.

—परंतु शिवराम होता तरी कुठें मग ? तिसऱ्या मजल्यावर काकांच्या खोलींत तो प्रेमाचा हात धरून त्यांच्यापुढें उभा होता. काका हसतमुखानें त्याचें म्हणणें ऐकून घेत होते. व प्रेमा लाजेनें त्यांच्या डोळयाला डोळा भिडविण्याचें टाळीत होती. शिवरामचें भाषण झाल्यावर काका हंसून म्हाणाले—

‘ आणि ही नकटी तुला आवडली ? पहा बुवा, आपल्याला काय कोणती तरी एक खपली म्हणजे झालं. प्रेमा पोरटे, लोकांनीं मूर्ख म्हणतां

म्हणतां तूंच लोकांना मूर्ख ठरवलंस कीं ! ऍ हॅ ! काय मुरकते आहे पण ! थांब आतां, आईसाहेब वर येऊं देत–'

नलिनीबाई संतापानें पाय आपटीत वर आल्या होत्या ! परंतु वरील देखावा अवलोकन करतांक्षणींच त्या एकदम शांतपणानें म्हणाल्या. 'शिवराम, म्हणून तुम्ही जाग्यावर नव्हतां काय ? छान झालं. तुम्हाला हेंच ऐकवायला आलें होतें कीं, कान्तेशी तुमचं लग्न होणं शक्य नाहीं.'

'अन् त्याला तरी तुमची ती विद्वान् वधू पाहिजे आहे कुठें ? ही नकटी त्याला पसंत आहे. बरा लवकर जागा झाला ' काका मधेंच म्हणाले.

'म्हणजे ?' नलिनीबाई आश्चर्यानें ओरडल्या.

'काकू, मला क्षमा करा. मला प्रेमाशींच लग्न करायचं आहे. सूर्यापेक्षां चंद्रच चांगला, नाहीं प्रमा ?' शिवराम हसून म्हणाला !

'म्हणजे, मी नाहीं कांहीं समजलें' नलिनीबाई विस्मयचकित मुद्रेनें म्हणाल्या !

'आपल्यासारख्या बुद्धिमान् माणसांना त्यांत न समजण्याजोगं काय आहे ? लग्नाला अजून पत्ताही नाहीं. अन् बिचाऱ्याला तुम्हीं आधींच घाबरून सोडलात. बायकोच्या भाषणाचे कागद जन्मभर वाचण्याची शिक्षा त्यानं काय म्हणून सहन करावी ? त्यापेक्षां त्यानं आपल्या तोलाचीच बायको पसंत केली आहे. जगानं आणि जन्मदात्या आईनंसुद्धां कोपऱ्यांत सरकावून दिलेली प्रेमा त्याला पसंत आहे.' काकांनीं खुलासा केला. आणि या खुलाशानें मात्र नलिनीबाईचें डोकें पुरतें फिरायला लागलें.

'पण–पण लोक काय म्हणतील ? हें असं बदलणं चांगलं दिसेल कां ?' त्या हताश मुद्रेनें म्हणाल्या.

'पण त्याला लग्न करायचं आहे प्रेमाशीं-लोकांशीं नाहीं. हे पहा, राणीसरकार, आतां तुम्ही जरा स्वस्थ पडा. व्याख्यान झालं का ?'

'तेंच, तेंच मी सांगणार होतें. कसं छान चाललं होतं. शिवरामनीं सगळा घोटाळा केला नाहींतर–'

'शेवटीं बायकोच्या धांदरटपणाबद्दल नवरा फाशी जायचा हें संसारांतलं पहिलं कलमच आहे म्हणा ! बरं जाऊं द्या. शिवरामनं घोटाळा

केला आहे याबद्दल त्याला हीच शिक्षा. मॅट्रिकला दोनदां बसून नापास होणारी ही मूर्ख मुलगीच त्याच्या गळ्यांत बांधू या.'

'हें पहा, जेंव्हां तेंव्हां तुम्ही प्रेमाच्या मॅट्रिकचा हा असा उल्लेख करतां हें बरं नाहीं.' शिवराम मध्येंच म्हणाला.

'यंव ! याला म्हणतात प्रेम ! प्रेमा, हा असला पांच मिनिटांत बायको बदलणारा नवरा तुला पसंत आहे का ?' काकांनीं प्रेमाच्या पाठीवरून हलकेच हात फिरवीत म्हटलें.

'इश्श ! काका, असं हो काय बोलतां ?' प्रेमा त्यांच्या हातांना बिलगून म्हणाली.

नलिनीबाई कांहींएक न बोलतां सभास्थानीं जमलेल्या भुतावळीला निरोप देण्यासाठीं खालीं गेल्या.

'अच्छा ! म्हणजे शिवराम, तूंही पण माझ्यासारखाच गाजरपारखीच दिसतो आहेस. कान्ता माझी मुलगी आहे. प्रेमाही माझीच आहे. पण आता खरं सागूं ? एकीला चढवायचं आणि दुसरीला तुच्छ लेखायचं हें धोरण मला मुळींच मान्य नव्हतं. आणि म्हणूनच मला तुझी ही नवीन पसंती एकदम मान्य आहे. आतां तुझ्या आईवडिलांना काय वाटेल हें तूं पाहून घे—'

'आमच्या अण्णांना मी आज ओळखत नाहीं—' शिवराम अवसानांत बोलूं लागला.

'पण मी तुझ्याहीपेक्षां जास्त वर्षं ओळखतों आहे. आणि म्हणूनच मी म्हणतों कीं-प्रेमा, आजच्या या आनंदाच्या प्रसंगीं झकासपैकीं कांदे-पोहे अन् चहा पाहिजे बरं कां—शिवरामला बायको सुग्रण आहे हा शोध लागला पाहिजे—'

प्रेमा हंसत हंसत खालीं निघून गेली. बायका निघून गेल्या होत्या. कान्तेच्या भाषणाच्या कागदांपैकीं एक कागद वाऱ्यानें उडून प्रेमाच्या पायाशीं येऊन पडला. प्रेमानें तो कागद सहजच उचलून घेतला—आणि मोठ्या भक्तिभावानें कोणी पाहात नाहीं असें पाहून तिनें त्या कागदावर आपले ओंठ टेकवले.

———

# दुखरी दाढ !  : : २

बरोबर पांचच्या ठोक्याला हणमंतराव नेहमींच्या संवयीप्रमाणें जागे झाले. आज जवळजवळ तीस वर्षें त्यांना ही लवकर उठण्याची संवय लागली होती. दोन वर्षांपूर्वी ते हुजूर डेप्युटी कलेक्टरच्या हुद्यावर होते; तोंपर्यंत कामाच्या रगाड्यामुळें त्यांना लवकर उठणें भागच होतें. सेवानिवृत्तीला दोन वर्षें होऊन गेलीं, कामाचा आतां यत्किंचितही बोजा त्यांच्या शिरावर नव्हता, तरी पण आज तीस वर्षें लागलेली संवय त्यांना सोडणें शक्य नव्हतें. त्यांत फरक एवढाच कीं पूर्वी चारला ते उठत असत. हल्लीं पांचच्या ठोक्याला त्यांना जाग येत असे. पण याला कारण त्यांचा आळशीपणा नव्हता तर सरकारी नियमाप्रमाणें घड्याळाच्या शेंड्या एक तासभर उपटण्यांत आल्या होत्या. त्यामुळें ते चारचे ऐवजीं पांचला उठूं लागले. अगदीं अभिजात सरकारी नोकर असला म्हणून काय झालें ? उद्यां घड्याळें आणखी दोन तास पुढें सरलीं म्हणून माणसांच्या नेहमींच्या वागण्यांत असा काय भलता फरक पडणार आहे ?

हणमंतरावांनीं बाहेरच्या हॉलमध्यें टांगलेल्या आजोबाशाही घड्याळांत पांचचे ठोके पडलेले ऐकले. त्यांच्यापासून दहा फूट अंतरावर टाकलेल्या छप्परी पलगावर सौभाग्यवती शारदाबाई अजून झोंपल्या होत्या. त्यांची झोंप आठच्या आंत उरकणें शक्य नव्हतें—हणमंतराव स्वतःशींच विचार

करीत पुटपुटले. शारदाबाईंना पहाटे कुणी झोंप मोडलेली मुळींच आवडत नसे. एकादे वेळेस चुकून हणमंतरावांच्या हातून दाराचा वगैरे आवाज झाला व त्यांची झोंपमोड झाली तर शारदाबाई दिवसभर त्यांच्याशीं बोलत तर नसतच, शिवाय वर नोकरमाणसांवर राग काढून हणमतरावांना भीक नको पण कुत्रा आटप असें वाटायला लावीत. हणमंतरावांना शारदाबाईंचा स्वभाव गेल्या वीस वर्षांत चांगलाच अवगत झाल्यामुळें ते सहसा पत्नीला विरोध करीत नसत. इतकेंच नव्हे तर हरएक गोष्टींत त्यांच्या कलानें घेण्याची त्यांनीं स्वतःला संवय लावून घेतली होती. लोक म्हणत, 'नवरा बुळा आहे बायकोच्या टाचाखालचें मांजर बनला आहे. एवढा मोठा अधिकारी, एवढा घमेलंभर पगार महिन्याच्या महिन्याला घरांत आणून ओततो. पण एक दिवस रात्रीं उशीर करून बाहेरून आला तर बया रात्रभर व्हरांड्यांत निजायला लावील. फार जहांबाज आहे बाई!' हणमंतरावांना लोकांचें हें पाठीमागचें बोलणें अजिबात माहीत नव्हतें असें नाहीं. त्यांना हें सर्व कांहीं कळत होतें. पण प्रश्न असा आहे कीं दुसरें लग्न करण्याचा मूर्खपणा माणसानें करूं नये; पण केलाच तर त्याचीं फळें त्यानें भोगावयाला नकोत? नाहीं तरी बिजवराला मिळणाऱ्या बायका थोड्याफार अशाच उठवळ स्वभावाच्या असतात. त्या जर सद्गुणाच्या पुतळ्या असत्या तर एकदां अपेशी ठरलेल्या माणसाच्या गळ्यांत माळ घालायला त्या काय म्हणून तयार होतील? शारदाबाई लहरी होत्या, मूर्ख होत्या आणि क्वचित् प्रसंगीं अत्यंत हेकेखोरही होत्या हें त्यांना अनुभवानें पटलें होतें. त्यांचा पहिल्या बायकोचा मुलगा प्रभाकर घरांतून पळून त्याच्या मामाकडे गेला तेव्हां त्यांनाही बायकोच्या ह्या हेकेखोरपणाचा अत्यंत राग आला. तसें म्हटलें तर प्रभाकरनें काय तिचें घोडें मारलें होतें?

कांहीं नाहीं. उलट आपल्या धाकट्या भावंडांना तो किती गोडींत वागवी! त्यांच्याशीं किती प्रेमानें खेळे! आईला बारीक सारीक गोष्टींत तो किती तरी मदत करीत असे! आईनें गालगुच्चे काढले तरी तो वडिलांना कळूं न देण्याविषयीं आटोकाट प्रयत्न करी. आईनें एके दिवशीं त्याला ढकलून दिलें होतें. कपाळाला खोंक पडली होती. परंतु वडिलांना त्यानें

सरळ थाप मारली. खेळतांना पडल्याचें त्यानें वडिलांना सांगितलें होतें. हणमंतरावांना हळू हळू पत्नीचा हा मूर्खपणा कळूं लागला. सावत्र आयांचा मूर्खपणा त्यांना केव्हांना केव्हां तरी उघडकीस आणल्यावांचून राहात नाहीं. सवतीच्या पोराला मारायचें तर लोकांना उघड दिसेल अशा रीतीनें मारूं नये. एवढी साधी उमज त्यांना राहत नाहीं. मुलाला उपाशी पोटी ठेवून त्याला छळणें शक्य नसतें हें त्याना उमगत नाहीं. अहो, तो कुठें तरी मामाच्या घरीं जातो. तिथें तो जेवल्याशिवाय राहील होय? आणि तिथें पोट भरल्यावर सहज एक दोन न बोलायच्या गोष्टी अभावित-पणानें तो बोलून गेला आणि त्याचा जगभर गाजावाजा झाला तर त्यांत त्या पोराचा दोष काय ?

शेवटीं बारा वर्षांचा प्रभाकर मामाच्या घरीं पळून गेला. त्या गोष्टीला आज दहा वर्षें झालीं. काय वेळ तरी झपाट्याने जातो पण! शारदाबाईचा मूर्खपणा कळून सवरून हणमंतराव सहन करीत होते. प्रभाकर गेल्याचें त्यांना वाईट वाटलें नाहीं. उलट आनंदच वाटला. पोरगा मोठा चुण-चुणीत होता. आणि सारे लोक म्हणत कीं थेट बापासारखा त्याचा चेहरा होता! असो, मामाच्या घरीं निदान सुखानें चार घास तरी बिचाऱ्याला खायला मिळतील! पत्नीशीं विरोध करणें त्यांना जमलें नाहीं. शारदा-बाईनीं म्हटल्याप्रमाणें जर खरोखरीच जीव देण्याचें मनांत आणलें असतें तर लोकांकडूनही त्यांना बोल लागल्याशिवाय राहिले नसते! लोकाना बोलायला काय होतें? दुसरीं लग्न करून पाहण्याचा मूर्खपणा त्यांनीं करून दाखवावा अन् बोलायला तोंड राहिलें तर बोलावें. हणमंतराव स्वतःशींच विचार करीत कॉटवर हा वेळपर्यंत बसले होते. कां कुणास ठाऊक. आजच हे विचार त्यांच्या डोक्यांत येऊन गेले. कदाचित् काल त्यांना कोणीतरी क्लबांत म्हणाले होते कीं, 'बी ए. चा निकाल उद्यां आहे.' म्हणून तर प्रभाकरची त्याना आठवण झाली असावी! असेलही! शक्य आहे. प्रभा-कर यंदा बी. ए. ला बसलेला त्यांना माहीत होतें.

विचारासरशीं ते कॉटवरून हलकेच आवाज न करतां खालीं उतरले. विचारांत किती वेळ गेला हें घड्याळांत पाहण्यासाठीं दिवा लावावा असें त्यांना वाटलें. पण पत्नीची झोंपमोड होण्याची भीति वाटल्यामुळें तों

विचार बाजूस सारणें त्यांना भाग होतें. पवलांचा आवाज न करतां ते उठून मधल्या हॉलमध्यें आले. दोन मुलगे आणि एक मुलगी ओळीनें घातलेल्या कॉटस्वर निवांत झोंपीं गेलेलीं दिसलीं. तिघांचे घोरण्याचे आवाज कमी अधिक प्रमाणानें कानावर येत होते. हणमंतरावांनीं हॉलमधला दिवा लावला. पांच वाजून पंचवीस मिनिटें झालेलीं दिसलीं. बाहेर अजून अंधारच होता. सहज विचार आला त्यांच्या मनांत—पूर्वी साडेपांचला जून महिन्यांत पांढरें फटफटीत होत असे. आणि आतां तर बाहेर कुत्रे सुद्धां फिरकतांना दिसत नव्हतें. हिंदुस्थानांत या-वेळीं साडेपांच वाचले आहेत हें सूर्याला अजून कसें कुणी सांगितलें नाहीं? छेः! हसण्यासाठीं विलग झालेलें ओष्ठद्वय त्यांनीं पुन्हां घट्ट मिटून घेतलें. सरकारच्या सावलीखालीं तीस वर्षे काढलेल्या राजनिष्ठ माणसानें त्याच सरकारची अशी चेष्टा करणें शोभत नाहीं!

झोंपेंत नलीनें 'अण्णा' म्हणून अर्धस्फुट आवाजांत मारलेली हांक ऐकतांच ते तिच्या कॉटजवळ गेले. मच्छरदाणी वर करून त्यांनीं आंत पाहिलें. नलीच्या अंगावरून खालीं सरकलेलें पांघरूण त्यांनीं मोठ्या आस्थेवाईकपणानें तिच्या अंगावर टाकलें. किती गोड पोरगी होती पण नली! दुसऱ्या संसाराची सुरवात नलीनें करून दिली होती. नलीचें वय अठरा असेल. चेहरा थेट आईचा उचलला होता पोरीनें! पण स्वभाव मात्र बापाचा! म्हणूनच हणमंतरावांना नली फार आवडत असे. प्रभाकरची सुद्धां ती फार लाडकी होती. प्रभाकर घरांतून कोणालाही न सांगतां पळून गेला तेव्हां ती लहान होती. पण तिनें [illegible] पुढें महिनाभर सारें घर डोक्यावर घेतल्याचें त्यांना आठवत होतें. काल तिनें सुद्धां प्रभाकर फर्स्ट क्लासांत येणार म्हणून वडिलांपाशी अभिमानानें पैज मारली होती. आणि ही कालची चिमुरडी आज एफ. वाय. पास झाली होती. कुणाला खरं तरी वाटेल का?

—हणमंतरावांनीं घड्याळांत सहाचे ठोके पडलेले ऐकतांच दिवा मालवला. आज त्यांना झालें होतें तरी काय? एक तासभर सारखें विचारचक्र! छे! विचार करण्यांत वेळ घालवला म्हणजे फिरायला वेळ फ़ारसा मिळणार नाहीं. कारण कांहीं झालें तरी आठच्या आंत त्यांना

परत यायलाच पाहिजे. चहाचे वेळीं त्यांनां उशीर झालेला शारदाबाईना आवडत नसे. माणसानें खाणेंपिणें सुद्धां वेळेवर करायचें नाहीं म्हणजे काय ? घाईघाईनें हणमंतराव आंतल्या बाजूस गेले.

साडेसहाच्या ठोक्याला जिना उतरून खालीं आले. आतां मात्र थोड-थोडा उजेड दिसूं लागला होता. बंगल्यासमोरच्या टुमदार बागेंत नुकतीच उमललेलीं फुलें पाहून त्यांना आनंद वाटला. प्रत्येक झाडाकडे ते निरखून पाहूं लागले. पिवळा गुलाब ! काल चार कळ्या होत्या. पैकीं दोन उमल-लेल्या होत्या; दोन उद्यां उमलतील ! जास्वंदीचीं लालभडक फुलें सकाळच्या मंद वायुलहरींशीं मोठ्या दिमाखानें खेळत होतीं मोगऱ्याचा ताटवा तर नुसता रसत होता. जिरेनियमच्या कुंडीकडे त्यांचें लक्ष वेधलें ! आणि तात्काळ त्यांच्या कपाळावर आठ्यांचें जाळें पसरलें ! एक—एक फूल दिस-तच नव्हतें ! बिऱ्हाडकरू तरी इतके मिजासखोर दिवसेंदिवस बनत चालले आहेत ! त्या भिकारड्या मास्तरड्याच्या पोरानें बहुतेक फुलांचा सत्यानाश करण्याकरतांच जन्म घेतला होता कीं काय कोण जाणें ! आणि त्या कारट्याचा बाप म्हणे पुढची पिढी तयार करणार ! डोंबल त्याचें ! स्वतःचें पोर याला सांभाळतां येत नाहीं अन् हा शहाणा म्हणे वर्गांत चाळीस पोरें सांभाळतो ! हे मास्तरडे इथून तिथून सगळे बुळे लोक ! या अक्कलमंदांना स्वतःचीं पोरेंसुद्धां सांभाळतां येत नाहींत. आणि यांचीं तीं कार्टी ! एक एक फूल राहूं देत नाहींत झाडावर !

हणमंतरावांनीं उपरिनिर्दिष्ट बिऱ्हाडकरूच्या ब्लॉककडे पाहिलें. थांबा ! ही लढाई थांबली कीं हाताला धरून बाहेर काढतों ! हणमंतरावांनीं हलक्या हातानें बटमोगऱ्याचें एक टपोरें फूल तोडून घेतलें. आ ! किती सुंदर वास! मोगऱ्याला कांहीं जण फुलांचा राजा म्हणतात तें उगीच नाहीं. फुलांचा वास घेत घेत ते फाटकाहेर पडले व नित्यनियमाप्रमाणें गांवाच्याबाहेर पडण्यासाठीं डाव्या बाजूला वळले. एक दोन पावलें टाकतांक्षणीं त्यांचे त्यांनाच हंसूं आलें ! आपण एक फूल रोज नित्य नियमानें हातांत धरून फिरायला जातों म्हणून लोक आपल्याला ‘ जहांगीर बादशहा ’ असें कुचे-ष्टेनें म्हणतात हें त्यांना माहीत होतें, त्याचेंच त्यांना हंसूं आलें ! जहांगीर बादशहा फुलाचा शौकीन् होता कीं नाहीं हें त्यांना नक्की माहीत नव्हतें.

कदाचित् नूरजहानच्या आवडीमुळें त्यानें फुलांचा शौक स्वतःला बळेंच लावूनहि घेतला असेल! कोणी सांगावें, ह्या बायका मोठ्या वस्ताद असतात. त्यांना स्वतःला तरी पूर्वी फ़ुलांचा नाद कुठें होता? एकदां ऑफिसमध्यें त्यांना कुणी तरी पानसुपारी केली होती. त्यावेळीं हारतुरे त्यांना देण्यांत आले. त्याच वेळीं ते तेथें जमलेल्या लोकांना उद्देशून म्हणाले होते कीं, त्या हारतुऱ्यापेक्षां ऑफिसांतल्या शिपायांना चार चार आणे बक्षिसी म्हणून देण्यांत आली असती तरी त्यांना आनंद वाटला असता. त्या गोष्टीला आज चांगलीं दहा बारा वर्षें झालीं असतील परंतु लोकांनीं फुलांसाठीं पैसे खर्च करावेत हें त्यांना त्यावेळीं पटत नसे. पण त्यांनीं शारदाबाईंच्या आग्रहावरून स्वतःच्या मालकीचा बंगला बांधला. तेव्हां शारदाबाईंनीं त्यांना बागेचें महत्त्व पटवून दिलें आणि तेव्हांपासून आजपर्यंत ते शारदाबाईंच्या मताला चिकटून होते. बागेंत कोणतीं फुलझाडें लावावींत हें शारदाबाईंनीं त्यांना शिकविलें! माळी कोणता आणावा, केव्हां आणावा, त्याला किती दमड्या देऊन वाटेला लावावा इत्यादि सारें ज्ञान ते पत्नीपासून शिकले. बिऱ्हाडकरूंच्या लहान मुलांनीं सहज खेळकरपणानें चार फुलें उपटलीं तर आकाशपाताळ एक झाल्याप्रमाणें अभिनय करून आकांडतांडव कसें माजवावें हेंहि त्यांना शारदाबाईंनींच शिकविलें होतें!

एखाद्या मुलानें झाडाचीं पानें तोडल्याची तक्रार शारदाबाईंनीं दहा पांच वेळां त्यांच्यापुढें मांडली कीं एकदां तरी त्यांच्या मनांत एक भयंकर विचार येऊन जाई कीं, पत्नीला चक्क सांगावें! ही फुलझाडांची आवड ठीक आहे. पण मुलें जास्त महत्त्वाचीं कीं फुलें? आज फुलें तोडलीं तर उद्यां येतील. पण मुलांची गोष्ट तशी आहे का? पण हें तत्त्वज्ञान त्यांच्या मनांतच राहून जाई. आणि पत्नीच्या समाधानासाठीं ते त्या मुलाच्या बापाला वर बोलावून घेत व स्पष्ट शब्दांत सांगत कीं, हें असें चाललें तर तुम्हांला जागा सोडावी लागेल. आम्हीं तुम्हांला आधीं बजावलें होतें कीं, आम्हांला आमच्या झाडांना मुलांनीं हात लावलेला खपणार नाहीं. पहा बुवा! तुम्हीं दुसरी जागा पहावी हें तुमच्या व आमच्या सोयीचें होईल!

आणि याचा परिणाम अर्थातच हा झाला होता कीं, साऱ्या गल्लींत

'हेकेखोर' मालक म्हणून त्यांच्या नांवाचा लौकिक पसरलेला होता. परंतु लोक काय म्हणतात याकडे लक्ष देणें त्यांना सोईचें नव्हतें. त्यांचें लग्न शारदाबाईशीं लागलें होतें,लोकांशीं नव्हतें. लोक हंसले तर हंसले पण पत्नीशीं नमतें घेणें त्यांना जास्त दूरदर्शीपणाचें वाटलें.

हा वेळपर्यंत ते बरेच दूरवर आले होते. चांगलेंच उजाडलें होतें. समोरच्या बाजूला सूर्याचे पहिले किरण पूर्वेच्या पाळण्यांतून हलकेच डोकावून वर पाहूं लागले होते. परत फिरण्याची वेळ झाली होती. खिशांतून घड्याळ काढून त्यांनीं पाहिलें. सव्वासात वाजले होते. पाऊण तासांत घर गांठणें अगदीं सहज जमलें असतें—परंतु वाटेंत त्यांना थांबणें भाग पडलें. गांवाच्या हद्दीवर समोरून एक सायकलस्वार झपाट्यानें येत होता. प्रभाकर असावा का ? नक्की तोच ! आणि पोरगा यावेळीं इतक्या घाईनें निघाला होता तरी कुठें ? अरे हो, आज त्याच्या परीक्षेचा निकाल, नाहीं का ? विचारू तर खरं ?

प्रभाकर त्यांच्याजवळ येतांच चटकन खालीं उतरला. त्याचा चेहरा घामाघूम झालेला दिसत होता. परंतु त्याचे डोळे नुसते नाचत होते.

" अण्णा—अण्णा, मी बी. ए. झालों. म्हणजे पहिल्या वर्गांत. तर्खडकर प्राईझ मला मिळालं आहे—" प्रभाकर धापा टाकीत म्हणाला. हणमतरावांचा स्वतःच्या कानावर विश्वासच बसेना. प्रभाकरानें तीच बातमी तिसऱ्यांदा सांगितली तेव्हां त्यांना समजलें. काय ? खरं आहे हें ? आपला मुलगा बी. ए. पास ? पहिला वर्ग ? अन् तर्खड का काय म्हणाला तें बक्षीस पुन्हां वर ? अजब आहे ?

" मीं तुम्हाला मुद्दाम सांगावें म्हणून इकडे तुमच्या फिरण्याच्या नेहमीच्या वाटेकडे आलों. काल संध्याकाळीं आमच्या मित्रमंडळींत चेष्टा चालली होती माझी. मी पहिल्या वर्गांत आलों तरी सुद्धां ते आज कॉलेजमार्फत माझा जाहीर सत्कार करण्याचा घाट घालणार आहेत. अण्णा, तुम्ही आलं पाहिजे. तुम्ही आला नाहींत तर मला आनंद वाटायचा नाहीं. आईच्या पश्चात् तुम्हीं माझं निदान आज तरी कौतुक केलं पाहिजे. याल ना ! मी जाऊं ? " प्रभाकर आला तसा घाईनें पुन्हा सायकलवरून पसार

झाला. हणमंतरावांनीं डोक्यावरल्या विजेच्या तारांकडे पाहून स्वत:शींच हास्य केलें! आकाशांत दूरवर उडणाऱ्या घारीस त्यानीं बजावलें कीं, ऐकलंस? प्रभाकर बी. ए फर्स्ट क्लास आहे! मुलगा कुणाचा आहे तो? अं? कुणाचा मुलगा आहे? काय चेष्टा आहे?

हणमंतराव घाईघाईनें उरलेला रस्ता कापीत घरीं आले. जवळजवळ अर्धा तास त्यांना उशीर झाला होता. शारदाबाई मधल्या हॉलमध्यें चहाचें आवरून वर्तमानपत्र वाचीत पडल्या होत्या. हणमंतरावांनीं हलकेंच खाकरून आपलें अस्तित्व त्यांना पटवून देण्याचा प्रयत्न केला. परंतु शारदाबाईनीं त्यांच्याकडे पाहिलें सुद्धां नाहीं. हणमतरावांच्या आतांपर्यंतच्या आनंदाला विरजण पडलें. ते कांहींच न बोलतां आंत जाणार इतक्यांत नली दुसरें वर्तमानपत्र हातांत घेऊन धांवत बाहेर आलेली त्यांना दिसली. "अण्णा, अण्णा-दादा पास झाला, त्याला प्राइझ मिळालं आहे. आतां दहा रुपये नाहींतर पंचवीस रुपये मला द्या. पेढे आणायचे आहेत—" शारदाबाईनीं वर्तमानपत्र बाजूस ठेवलें व नलीकडे पाहून शांतपणें म्हटलें. "नले, सकाळची ही धिगामस्ती तुला शोभत नाहीं! बरं का? वाड्यांतल्या माणसांना आपला बंगला म्हणजे राणीचा बाग आहे असं का वाटायला लावलं पाहिजे. आधीं आंत जा अन् स्वैपाकाच्या बाईला सांगून शिल्लक राहिलेला चहा त्यांना आणून द्यायला मदत कर जा पाहू आधीं मुकाट्यानं—"

शिल्लक राहिलेला चहा पिण्याची हणमंतरावांना मनापासून शिसारी बसलेली होती, पण यावेळीं तक्रार करणें त्यांना इष्ट वाटलें नाहीं. नलीच्या पाठोपाठ ते मुकाट्यानें आपल्या खोलीकडे गेले. लहान पोरांना जी अक्कल असते ती मोठ्या माणसांत दिसूं नये! आश्चर्य आहे!

सबंध दिवस ते स्वत:शींच विचार करण्यांत गर्क झाले होते. शारदाबाई सकाळपासून त्यांच्याशीं तुटकपणानें वागत होत्या. एरव्हीं त्यांना पत्नीचा हा तुटकपणा जाणवला असता. मुलें आसपास नाहींत असें पाहून पत्नीचें मन साफ करून घेण्याचा त्यांनीं मनापासून प्रयत्न केला असता. परंतु आज त्यांना लाचारपणा पत्करावासा वाटला नाहीं. माणसानें अभिमान

सोडायचा, सोडायचा तरी किती! प्रभाकर बी. ए. झाला यामुळें जर एकाद्याच्या कपाळची शीर उठत असेल तर तो ज्याचा त्याचा प्रश्न आहे त्याला ते काय करणार? हणमतरावांनीं नित्याच्या संवयीप्रमाणें पत्नीशीं लाळघोटेपणा तर केलाच नाहीं उलट तिच्या या तुटकपणाचा आज त्यांना एकप्रकारें आनंदच वाटला. पत्नी अबोल्याच्या अवस्थेंत असतां ते ज्या ज्या गोष्टी करीत त्याला कोणाकडूनही आडकाठी येत नसे. या गोष्टीचा फायदा घेण्याचें त्यांनीं ठरवलें. दुपारीं तिघांही मुलांना त्यांनीं प्रत्येकाच्या मागणीप्रमाणें दहा, दहा रुपये दादाच्या परीक्षेचे पेढे आणण्यासाठीं उदार मनानें देऊन टाकले.

डोकें दुखण्याच्या सबबीवर शारदाबाई झोंपण्याच्या खोलींत पडून बाहेरच्या हॉलमध्यें चाललेलें संभाषण जळफळणाऱ्या चित्तानें ऐकून घेत होत्या. एकदोनदां त्यांनीं चिडून नलीला मोठ्यांदां आवाज न करण्याविषयीं ओरडून सुनावलें. बाहेर नलीनें वडिलाच्या चेहेऱ्यावर एकदम आलेली खिन्नता न्याहाळून पाहिली, आणि आपलें भाषण आवरतें घेतलें. हणमंतरावांनीं समारंभाविषयीं कोणालाही एका अक्षरानें सांगितलें नाहीं. कोणीं विचारलेंच नाहीं तर आपण होऊन सांगण्यांत तरी काय स्वारस्य होतें?

संध्याकाळीं सहाच्या ठोक्याला ते आपला जुना सूट चढवून फिरण्यास बाहेर पडले.

सकाळीं उमललेल्या मोगऱ्याचा ताटवा आतां अगदीं मलूल झाल्यासारखा त्यांना वाटला. बरींचशीं उमललेलीं फुलें बुंध्यापाशीं तांबड्या मातींत मिसळलेलीं त्यांनीं पाहिलीं. कां कुणास ठाऊक, त्यांतील एक चिखलांत लोळणारें फूल त्यांनीं हलकेंच उचलून घेतलें. बागेतल्या नळावर पाकळ्यांनां लागलेली माती त्यांनीं काळजीपूर्वक धुवून काढली व आतां पांढऱ्या स्वच्छ दिसणाऱ्या फुलाचा हलकेच वास घेत ते फाटकाबाहेर पडले. आपल्याला जहांगीर बादशहा म्हणून लोक हंसतात काय? हं:! लोकांना काय कळतें आहे?

—परंतु ते आज नित्याच्या वाटेनें फिरावयास गेले नाहींत. त्यांच्या

चालण्यावरून कोणीही ताडलें असतें कीं आज या गृहस्थाचा फिरायला जाण्याचा उद्देश खास नव्हता. फिरायला जाणारा मनुष्य ओठ आवळून काय म्हणून चालेल?

हणमंतराव निर्विकार मनानें प्रभाकराच्या कॉलेजांत शिरले. किती तरी वर्षांनीं पुन: ते कॉलेजच्या आवारांत आज प्रथम पाऊल टाकीत होते.

—समारंभ मोठ्या उत्साहानें पार पडला. सारा समारंभ उरकेपर्यंत हणमंतराव शांत मनानें खुर्चीवर बसून पुढें काय चाललें आहे तें पाहात व ऐकत होते. प्रभाकराच्या चारदोन स्नेह्यांनीं त्याचें खूप कौतुक केलें. कॉलेजच्या मुख्याध्यापकांनीं असल्या हुशार विद्यार्थ्यांमुळें कॉलेजचें महत्त्व कसें वाढतें हें सुमारें पंधरा मिनिटें सर्वांना समजावून सांगितलें. लोकांनीं स्तुतिपर भाषणें करावींत व तीं आपण निर्विकारमनानें ऐकून घ्यावींत ही संवय त्यांना अधिकाराच्या जागेवर असतां लागली होती. त्यामुळें त्यांच्या मनावर भाषणांचा मुळींच परिणाम झाला नाहीं. परंतु—परंतु प्रभाकराच्या गळ्यांत हार घातलेला पाहून त्यांचा ऊर एकाएकीं भरून आला. इतरांनीं टाळ्या वाजवल्या. त्यांनांही टाळ्या वाजवाव्या असें क्षणभर वाटलें. परंतु त्यांचे हात जागचे हालेनात. पोराच्या विषयीं एकदम त्यांना कांहीं तरी वाटूं लागलें. लहान्या प्रभाकराला बारशाच्या दिवशीं त्यांनीं जसा उचलून छातीशीं घट्ट दाबून धरला होता तसा आजही त्याला घट्ट दाबून धरावा असें त्यांना वाटूं लागलें. लहानग्या प्रभाकराची ती हंसरी मूर्ति त्यांच्या डोळ्यांपुढून कांहीं केल्या हालेना. प्रभाकरला आपण जिवापलीकडे जपूं ही खात्री असल्यामुळें पत्नीनें मरतेसमयीं आपल्याला कसलीही शपथ घ्यायला लावली नाहीं हें ते जाणून होते. आणि आतां त्यांना एकदम वाटूं लागलें कीं लोक कांहींही म्हणोत प्रभाकराला हाताला धरून घरीं न्यावें. त्याला जें जें आवडेल तें आणून द्यावें आणि तो जें जें बोलेल तें ऐकत उरलेला जन्म काढावा.

—एक मुलगा त्यांच्यापुढें एक मोठा गुच्छ धरून उभा असलेला त्यांनीं पाहिला. भावनेच्या उद्रेकासरशीं त्यांना दाटून आलें. हात पुढें केलेला त्यांनीं झटकन् मागें घेतला. या सन्मानाला आपण नालायक आहोंत असेंच कांहींसें त्यांना वाटलें असावें.

समारंभानंतर अल्पोपाहार देण्यांत आला होता. उपाहाराचे वेळीं बऱ्याच लोकांचें लक्ष आपणाकडे असल्याचें लक्षांत येतांच ते गांगरले. अधिकाराच्या जागेवर असतां गांगरणें, गोंधळणें या मानवी भावना त्यांच्या मनाला स्पर्शही करूं शकत नव्हत्या. परंतु ही वेळ मात्र निराळी होती. शरीरानें ते वृद्ध बनले होते परंतु आज मनानें ते आपल्या पोरा-प्रमाणेंच तरुण बनले होते. तारुण्याची लाजरी वृत्ति आज त्यांना सोडा-यला तयार नव्हती. सर्वांना न दिसेल अशा बेतानें ते कॉलेजच्या आवारां-तून हलकेच बाहेर पडले. परंतु पुढच्याच कोपऱ्यावर त्यांना प्रभाकरानें मागून येऊन हटकलें. प्रभाकराच्या हातांतला हार किती सुरेख दिसत होता! हणमंतराव त्या हाराकडे पाहूं लागले.

"आण्णा," थोडा वेळ विचार करण्यासाठीं प्रभाकर थांबला. नंतर घाईघाईनें तो म्हणाला, "आण्णा, तुम्हांला मी परका नाहीं. मी तुमचा मुलगा आहें. अन् तुमचा मुलगा आहें हें सांगण्यांत मला अभिमान वाटतो. मी तुमच्यापासून कितीही दूर असलों तरी मी तुमचाच आहें. अण्णा, मला एकच गोष्ट तुमच्या तोंडून ऐकायची आहे. त्यासाठीं माझा जीव तडफडतो आहे. तुमच्या नांवाला बट्टा लागेल असं माझ्या हातून आजवर कांहीं झालेलं नाहीं?" हणमंतरावांनीं खिशांतून रुमाल काढला. डोळ्यांत कांहीं तरी गेलें असावें तें पुसून टाकण्याचा प्रयत्न करीत ते घोगऱ्या आवाजांत म्हणाले—"प्रभाकर, तूं माझा मुलगा आहेस असं तूं म्हणतोसच. तेव्हां तुझ्या हातून गैर असं काय होणार आहे? दुर्दैवानं तुला घर सोडावं लागलं. पण झालं तेंच एका अर्थानं चांगलं झालं. तूं घरांतून पळून गेला नाहींस. तूं आपली तुरुंगांतून सुटका करून घेतलीस. तूं यशस्वी झालास पण—"

"अण्णा, माझं मन शांत झालं. आतां माझी काळजी दूर झाली. मी दूर असणें योग्य आहें असें मला वाटत होतें. पण तुम्हाला तें कित-पत आवडलें याविषयीं मी गेलीं दहा वर्षें साशंक होतों. आतां मी भीत नाहीं. अण्णा, तुमचा मला आशीर्वाद आहे. किती झालं तरी आपण पुरुष आहोंत. बायकांना तितकासा समज नसतो. दुर्दैव! पण तुम्ही किंवा

मी एकमेकाला विसरून जाणं शक्य नाहीं— " प्रभाकर झटकन माघारीं वळला.

हणमंतराव आज पुन्हां नेहमींपेक्षां थोडा वेळ उशिरानें घरीं आले. पत्नीचा अबोला आतां एक आठवडाभर तरी चालणार असें त्यांचें मन त्याना सांगत होतें. परंतु त्याची भीति आतां त्याना भेडसावूं शकत नव्हती. प्रभाकर त्यांचा होता. त्यानें स्वतःच अभिमानानें कबूल केलें होतें. आणि यापुढें तो कितीही दूर असला तरी त्यांचाच होता. या बायकांना तितकासा समज नसतो म्हणून तो म्हणाला तें खरंच. बायकांच्या मूर्ख लहरींसाठीं पुरुषांनीं आपलीं वात्सल्याचीं नातीं विसरण्याचें काय कारण ?

हॉलमध्यें पाऊल टाकतांच त्यांना शारदाबाई वाट पाहात असलेल्या दिसल्या. शारदाबाईचा चेहरा अबोल्याचा नव्हता. हणमंतरावांनीं ओळखलें कीं त्यांना चिडवण्यासाठीं त्या वाट पहात असाव्या. हणमंतराव हातांतील काठी दरवजाआड ठेवलेल्या स्टँडवर लटकावीत होते.

" आज प्रभाकरच्या कॉलेजांत कसलासा समारंभ होता म्हणे. नली सांगत होती मघाशीं—" शारदाबाई शांतपणानें म्हणाल्या.

हणमंतराव दचकले. म्हणजे नलीनें आपल्याला प्रभाकरच्या कॉलेजांत पाहिलें कीं काय ! ते धडधडणाऱ्या छातीवर हात ठेवून पत्नीकडे पाहूं लागले.

" ती जाणार होती कॉलेजांत पण माझ्या डोक्याला अमृतांजन चोळायचं काम होतं तिला– " शारदाबाई बोलत होत्या !

हणमंतरावांच्या डोक्यांत तिरमिरीसरशी विचार येऊन गेला कीं पत्नीला स्वच्छ सांगून टाकावें. होय ! मी गेलों होतों समारंभाला ! तो माझा मुलगा आहे. मी त्याचा जन्मदाता आहें. अन् मला त्याचा अभिमान वाटतो—मग काय म्हणणं आहे राणीसरकारचं ?

" तुम्ही तरी निदान जायला हवं होतं. लोकांत बरं दिसेल असं वागणं आपल्याला भाग आहे–" शारदाबाई म्हणाल्या. हणमंतरावांनीं पत्नीकडे तिरस्काराच्या दृष्टीनें पाहिलें. मनांतले जळजळीत विचार बोलून टाकण्यासाठीं त्यांची जीभ तडफडत होती.

परंतु !

परंतु वीस वर्षें बायकोपुढें नमतें घेण्याची संवय जडलेल्या मनाला तें धारिष्ट एका दिवसांत कसें आणतां येणार ? हणमंतरावांनीं खिन्नपणानें कोट काढायला सुरवात केली. त्यांच्या मनांत विचार घोळत होता कीं, दुसऱ्या दाढेचें दुखणें आणि दुसऱ्या लग्नाचें दुखणें अगदीं सारखें आहे. लोकांना वरून दिसत नाहीं. परंतु आंत कोण इंगळ्या लागलेल्या असतात तें ज्याचा तोच जाणूं शके !

हणमंतरावांनीं एक दीर्घ निःश्वास सोडून हातांतला कोट कपाटांत लटकवून दिला !

---

## चुकतें कुठें : : ३

कायदेशीर रीतीनें ते पतीपत्नी म्हणून मिरवूं लागले. बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण होतांच दोघांनी परस्पर विवाहबद्ध होण्याचें ठरविलें होतें त्याप्रमाणें ते रजिस्टर पद्धतीनें आतां एकजुटीनें प्रवास करूं लागले. आत्तां-पर्यंत सगळें कसें सुरळीत जमून आलें पण !

इंटरच्या वर्गांत असतांना एके दिवशीं त्यांची अचानक ओळख झाली. आणि तीसुद्धां नेहमीच्या ठराविक संकेतस्थळीं नाहीं. कॉलेजच्या संमेलना-प्रसंगीं ज्या ओळखी होतात त्या पावसाची पहिली सर आल्यावर भाजलेल्या मातीचा जो उन्मादक सुगंध उठतो त्याप्रमाणें तात्कालिक असतात. दुसऱ्या सरीला त्या सुगंधाचा मागमूसही उरत नाहीं. तद्वत् या नैमित्तिक ओळखी फारशा चिरंजीव ठरणाऱ्या नसतात. थिएटरांतल्या, मंडईतल्या, फिरायला जाणाच्या ठिकाणीं झालेल्या, इत्यादि सर्व प्रकारच्या ओळखी बेभरंवशाच्या असतात. त्यांतून नक्की लाजाहोमाची सहाण पुढें येईलच याची खात्री नसते. आतां त्यांतूनही कांहींजण पुढें सरकतात, नाहीं असें नाहीं, परंतु अपवादानें नियमाला बाध कसा येईल ?

नीलेची ओळख प्रभाकरनें अगदीं निराळया पद्धतीनें घडवून आणली. त्यात पूर्व तयारीचा भाग जवळ जवळ कांहीं नव्हता. अंधाऱ्या रात्रीं काळया कुट्ट मेघांनीं मूळच्याच अंधाराला साह्य करण्याचें ठरविलें असतां एखाद्या

वाटसरूची मोठी आगतिक स्थिति होते. पायाखालची वाट दिसत नाहीं, कुणाला विचारावें म्हटलें तर आजूबाजूला कोणी दिसत नाहीं. अशा वेळीं दूरवरच्या कोपऱ्यांत विजेचा चमचमाट झाला असतां बिचारा वाटसरू किंचित काल कां होईना आनंदानें महिरुन गेल्यासारखा होतो. पुढचा मागचा विचार न करिता तो वेड्यासारखा दिसेल त्या रस्त्यानें पुढें धावूं लागतो. प्रभाकरची अगदी हीच गत झाली. घरीं वडील आणि मातोश्री कसल्याशा कॉन्ट्रॅक्टच्या निमित्तानें भावनगरच्या बाजूला झुकले होते. ते कमींत कमी वर्ष दोन वर्षे तरी चिरंजिवाला आपलीं अंगाई गीतें ऐकवायला परत येतीलसें दिसत नव्हतें. येवढ्या मोठ्या वडिलोपार्जित घरांत प्रभाकराचा एकटा जीव रमणार तरी कसा ? वाड्यांत बिऱ्हाडे दोन चार होती. परंतु ती मुंबईच्या वस्तीला जन्म काढलेली असल्यामुळें सोबतीच्या दृष्टीनें पाहतां असून नसल्यासारखीच होती.

रोज सकाळी आठ साडे आठला झोपून उठावें, दोन बोळ ओलांडून तिसऱ्या बोळांत एका जुन्या तबेल्यांत नवीनच उघडलेल्या एका 'लंडन रेस्टारंट 'मध्यें काळामिचकूट चहा प्यावा आणि तो घेतला नसता तर बरें झालें असतें असें पश्चातापाचे विचार डोक्यांत घोळवीत आंबट तोंडानें परत यावे, नंतर अकरा वाजण्याचे सुमारास कुठल्या तरी आश्रमामध्यें भोजन म्हणून वाढण्यांत आलेले चार अर्धकच्चे घांस पोटांत ढकलावे व चिडलेल्या मनस्थितींत कॉलेजचा रस्ता पकडावा.

आणि कॉलेजांत तरी त्याला मनाला विरंगुळा पडण्याजोगें काय होतें ? तीच तीच पुस्तकें, तेच तेच विषय आणि तेच तेच प्रोफेसर. प्रोफेसरांच्या गळ्यांतील टायसुद्धां गेली दोन वर्षे बदलल्याचे त्याला आढळून आले नाहीं. आणि शिकवण्यामधे तरी आणखीन निराळे दिवे काय लागत होते ? सगळ्यांची एक तऱ्हा. ज्यानें उठावें त्यानें शिळ्या कढीला ऊत आणून ती ताजी आहे असें भासविण्याचें ढोंग अविरत चालविलें होतें. संस्कृतचा प्रोफेसर येई तो म्हणे कालिदास श्रेष्ठ. इंग्रजीचा प्रोफेसर येई तो ओरडे शेक्सपिअर श्रेष्ठ. एकूण सगळी विद्वानांची पिढी भूतकाळांत रममाण झालेली होती. त्यांना आधुनिक युगांतले जवाहरलाल नेहरू, महात्मा गांधी कॉमरेड स्टॅलिन इत्यादि चमकणारे हिरे अजून दिसलेच नव्हते. अशा

ह्या वातावरणांत त्याचा जीव रमावा कसा ? कॉलेजांत शिरले कीं त्याला कापड गिरणीच्या एका गुदामाची आठवण होई. सगळे गठ्ठे सारखे, त्यांचा वास तो ठराविक, आणि त्यांना गति म्हणून कशी ती नाहींच.

त्याच्या जवळच्या एकदोन मित्रांनीं त्याला स्वच्छ बजावलें कीं "हें लक्षण ठीक नाहीं."—प्रभाकरसारख्या तरुणानें असा जिवाचा त्रागा करून घेतला कीं नक्की समजावें. काय ? प्रभाकरला आतां बहुतेक प्रेमांत पडण्याच्या रोगाची बाधा होत असावी असें त्याच्या मित्रांनीं बोलून दाखविलें.

प्रेम ? हं; तो स्वत:शीच हसला. परंतु त्याचवेळी समोरच्या राखीव बाकांवर ब्रमलेल्या व्यक्तीकडे त्याची नजर आपोआप वळली. आणि त्याच क्षणी त्यानें आपली नजर दूर आकाशाकडे लावली.

तो स्वत:शीच विचार करूं लागला; कॉलेजांत येणाऱ्या प्रत्येक स्त्रीला कॉलेज कन्यका म्हणून म्हणतात. आणि येथें तर कन्यका ह्या अवस्थेला शोभणारी एकहि व्यक्ति दिसत नाहीं. यांतील बहुतेक जणी कॉलेजांत शिकत आहेत याचें मुख्य कारण म्हणजे अजून लग्नाच्या बाजारांत त्यांच्या सौंदर्याला मागणी आली नसावी हेंच होय. त्याला आठवलें, कोणत्याशा एका इंग्रज लेखकानें म्हटलें होतें कीं राजकारणांत आणि शिक्षण क्षेत्रांत सुंदर स्त्री औषधाला मिळायची नाहीं. चुकून जर एखादी स्त्री या क्षेत्रांत शिरलीच तर तिच्या करतां महायुद्धें निर्माण झाल्याशिवाय राहाणार नाहींत. ज्यावेळी प्रथम त्यानें हें वाचलें होतें तेव्हां त्याला लेखकाच्या लेखनशैलीचें कौतुक वाटलें होतें. परंतु आज मात्र त्याला लेखकाच्या विचार शक्तीचेंही कौतुक वाटूं लागलें.

सगळ्या जणी येथून तेथून 'काकू' दिसत होत्या. त्यांच्यांतल्या बऱ्याचजणी आत्याबाईसुद्धां शोभल्या असत्या. काय एकेकीचें सौंदर्य उतास चाललें होतें पण ? एकीच्या केसाची हातांच्या मुठीएवढी जुडी तर दुसरीच्या दंडाच्या लेखण्या झालेल्या. एक बहिरी तर दुसरी चकणी. ‥एक उंटासारखी उंच तर दुसरी गुळाच्या ढेपेसारखी बसकट. छे. ! प्रेमाच्या रोगाला ह्या सौंदर्याचें अनुपान म्हटलें म्हणजे रोग्याची आठ दिवसांत रवानगी करावी लागायची—वेड्याच्या इस्पितळांत किंवा स्वर्गांत. कां ?

सनातनी लोक कॉलेजांत एकादे वेळीं एकादी अजब गोष्ट घडून आली कीं कॉलेज म्हणजे नुसता मीना बाजार करून सोडला आहे असें सात्विक संतापानें चिडून म्हणतात. प्रभाकराला तर या ठिकाणीं नुसता मच्छी-बाजारच भरलेला दिसत होता;

—आणि आश्चर्य काय सांगावें ? नीला मुंबईचें कॉलेज बदलून पुण्यास प्रथम ज्या दिवशीं त्याच्या कॉलेजात शिरली त्या दिवशी वीज चमकल्याचा त्याला भास झाला. पाटीभर बटबटीत झेंडूच्या फुलाआड दडलेल्या एकाद्या पिवळ्या गुलाबाच्या अर्ध विकसित कळीप्रमाणें नीलेला पाहून त्याला भास झाला. शेंभर भेंडीच्या पसाऱ्यांत एकादी वाटाण्याची शेंग जशी मनाला मोह पाडते त्याप्रमाणें त्याला झालें. प्रभाकरनें ठरवून टाकलें कीं या पोरीशीं कांहीं तरी कारण काढून बोललेंच पाहिजे. ही कोण ? कुठली ? विचार काय—?

—आणि अचानक एके दिवशीं तो कॉलेजांतून घरीं जायला फाटका बाहेर पाऊल टाकणार तोंच नीलेला घरीं निघालेली त्यानें पाहिली. एक क्षण-भरच त्याच्या मनानें कच खाल्ली असेल परंतु दुसऱ्या क्षणी तो धीर धरून म्हणाला,—" घरीं चाललांत वाटत. "

नीलेनें त्याच्या या धीटाईकडे डोळे रोखून पाहिल्यासारखें केलें ! प्रभाकर मनांत म्हणत होता काय हे डोळे ! एक एक डोळा म्हणजे—! त्याच्या प्रश्नाचें उत्तर नीलेनें दिलें नाहीं. ती एकवार हसून पुढे जांऊं लागली.

" मलाही तुमच्याच बाजूला यायचं आहे— " प्रभाकर आपला घाबरटपणा शक्यतोंवर झाकून टाकीत म्हणाला. नीलेनें आश्चर्यानें त्याच्या-कडे पाहिलें. " तुम्हाला काय पाहिजे आहे ? " नीला त्याच्या नजरेला नजर भिडवून म्हणाली. प्रभाकर या प्रश्नानें थोडासा दबला परंतु लगेच सावरून उत्तरला—, " तुम्हाला राग येत नसेल तर मला तुमची ओळख पाहिजे आहे आणि आत्तां तुमच्याबरोबर यायला परवानगी पाहिजे आहे." आपण काय वेड्यासारखें बोललों याची त्याला भीति वाटूं लागली. ही पोरगी तर आतां पायांतली वहाण काढणार, चारचौघांत आपली निर्भ-र्त्सना करणार आणि शेवटीं मुलींच्या स्वभावधर्माला जागून प्रिन्सिपॉल

कडे आपलीं तक्रार सुपुर्द करणार या भीतीनें तो गांगरून गेला. मात्र नीलेनें वहाण हातांत घेतली नाहींच परंतु एकवार मोठ्यानें हंसल्यासारखें केलें व म्हटलें, " इश्श ! माझी ओळख करून घ्यायला तुम्हांला इतकं जड कां वाटावं ? अन् असें चोरून दूध प्यालेल्या बोक्यासारखें घाबरलांत कां ? माझी ओळख करून घेतांना इतकं घाबरावं लागतं म्हणजे मी कुणीतरी तार्तरी देशाची सम्राज्ञी आहे कीं काय ? अन् तुम्हांला जर माझ्या रस्त्यानें यायचं असेल तर त्याला माझी परवानगी कशाला ? "

प्रभाकर प्रथम आश्चर्यानें व नंतर आदरानें तिच्या तोंडाकडे पाहूं लागला. ही पोरगी कॉलेजांतील अखिल स्त्री जातीला बट्टा लावणारी होती ! ही कॉलेजांत आली तरी कशी ?

—आणि—आणि थोडक्याच दिवसात त्यांनीं परस्पर सूत जमवलें.

नीलेच्या वडिलांनीं मुळीच हरकत घेतली नाहीं. मुलांत त्यांना कसलाच दोष दिसला नाहीं. पहिल्या दिवसापासून प्रभाकराविषयीं त्यांचें चांगलें मत बनलें होतें. फक्त वयानें दोघेही सारखे होते तेव्हां या गोष्टीचा विचार दोघांनीं केलेला बरा एवढें मात्र त्यांनीं नीलेला जातां जातां सुचवलें. प्रभाकराला त्यांनीं नीलेच्या गतायुष्याची पूर्ण जाणीव करून दिली. पोरगी ऐषआरामांत वाढलेली होती. दिवाणखान्यांत मध्यभागीं मांडण्यांत येणाऱ्या टेबलावरचा पाम ज्या काळजीनें वाढवला जातो त्या काळजीनें आईच्या पश्चात् वडिलांनी मुलीला वाढवली होती. तिला कडक ऊन सोसणें माहीत नव्हतें कीं थंडीचा थोडासासुद्धां वारा सहन झाला नसता. कुठेही प्रवासाला गेली तरी तिला सेकंडक्लासशिवाय त्यांनीं जाऊं दिलें नव्हतें. ती मागेल तें त्यांनीं आजवर मोठ्या आनंदानें तिला आणवून दिलें होतें.

" तेव्हां माझ्या सांगण्याचा अर्थ एवढाच प्रभाकर, कीं तूं हें सर्व ध्यानांत ठेवून ही उडी घ्यावीस. नीला एरव्ही खडीसाखरेसारखी गोड आहे. द्राक्षासारखी नाजूक आहे. मात्र लहरी आहे. एकादे वेळीं तिची लहर फिरली तर मात्र देव तुझं रक्षण करो. मी मुलीचा बाप आहें. तिचे

हजार दुर्गुण मी पोटांत घालीन पण तुझी गोष्ट तशी नाहीं. तूं अजून परका आहेस—" प्रभाकराला बाबासाहेबांनीं बजावलें.

परंतु प्रभाकर आतां माघार घ्यायला तयार नव्हता. नीलेशीं बोलतांना त्यानें आपलें स्वप्न तिला बोलून दाखवलें—

" जिमखान्यावर मी एक बंगला बांधीन. मी म्हणजे आपण हं. आपल्या मनाप्रमाणं सर्व कांहीं सोयी आपण स्वतःच्या देखरेखीखालीं करून घेऊं. तुला एक स्वतंत्र हॉल. मला एक स्वतंत्र हॉल. नंतर आपलें दोघांचें एक शयनगृह. तुझ्याकडे कुणी मैत्रिणी आल्या कीं त्यांच्याशीं चार घटका बातचीत करायला एकादी स्वतंत्र खोली लागेलच. मलाही पण एक लागेल. नंतर जेवण्याकरतां एक खोली. मला वाटतं एकदर दहा किंवा अकरा खोल्या पुरे होतील नाहीं ? "

नीला त्याच्या तोंडाकडे अनिमिष नेत्रानें पहात कौतुकानें मान डोलवीत उद्गारली; " प्रभाकर किती चांगला आहेस रे तूं ? तुला सारं सारं कसं बघ बरोबर आठवतं ! पण आपल्या बंगल्याला सजवायला फर्निचर मी निवडणार बरं कां ? पुरुषांना नाहींतरी घरांतलं कांहींच कळत नाहीं. "

" कसं कळणार ? त्यांना फक्त घरातलं माणूस तेवढंच कळतं— खरं कीं नाहीं ? " आणि दोघेंहि मनापासून हंसले.

बी. ए. झाल्यावर लग्न करायचं त्यांनीं ठरवलं. हें सर्व ठीक झालं परंतु—

वडील आणि मातोश्री दोन वर्षांनीं परत आले. त्यांच्या कानावर ह्या गोष्टी गेल्या तेव्हां ते दिग्मूढ झाल्यागत प्रभाकरच्या तोंडाकडे पाहूं लागले. आपला पोरगा आपल्या पश्चात् हे उद्योग संभाळीत होता हें त्यांच्या मेंदूला पटेचना. जेव्हां पटलें तेव्हां त्यांनीं प्रभाकराला दोन गोष्टी सांगितल्या ! इतकी श्रीमंताची पोरगी आपली सून व्हावी हें वडिलांना जरा चमत्कारिक वाटत होतें. आईच्या दृष्टीनें मुलांत आणि सुनेंत एक वर्षाचेंही अंतर नसावें हें विचित्र वाटत होतें. परंतु प्रभाकरचा निश्चय आजमावून त्यांनीं आपला हेका सोडण्याचें ठरविलें. आणि अशा रीतीनें

हें लग्न इतर लग्नाप्रमाणे उरकलें असतें आणि सर्व कांहीं मामुली पद्धतीनें पार पडलें असतें पण---

—पण नीलेची लहर मधें झाली ! तिचें डोकें निराळ्याच विचारानें भारलें गेल्याचें प्रभाकरला समजून आलें. इतर लोकांच्याप्रमाणें मधें अंतरपाट धरून हळदीच्या बोहल्यावर जर लग्न करायचें तर मग आपला प्रीतिविवाह कसला ? असलें अळणीपणाचें आयुष्य काढण्याची तिची तयारी नव्हती. वाडवडिलांच्या पैशावर उड्या मारायच्या तर मग येवढी आटापीट पाहिजे कशाला ? छे ! तिला जुनी पद्धत मुळीच मान्य नव्हती. प्रभाकरला तिनें स्पष्ट बजावलें " आपला हा प्रीतिविवाह बोहल्यावर होतां कामा नये. रजिस्टर पद्धतीनें आपला विवाह नको का व्हायला ? अन् शिवाय लग्न झाल्यावर आपल्याला स्वतंत्र बंगल्यांत नको का राह्यला ? "

" अग पण स्वतंत्र बंगला काय एका दिवसांत तयार होतो वाटतं ? " प्रभाकर गोंधळलेल्या मुद्रेनें म्हणाला.

"चार दिवस आपण कुठेंही काढूं. इकडे बंगल्याची ऑर्डर देऊं तोपर्यंत आपण एक महिनाभर मुंबईला सरदार गृहांत जाऊन राहूं. नंतर एक महिना माथेरानला काढूं. महाबळेश्वरला दोन महिने राहूं. तोपर्यंत चार महिन्यांत बंगला तयार होईलच कीं नाहीं ? " नीलेची स्थापत्य शास्त्रांतली ही प्रगति पाहून प्रभाकर सर्दच झाला.

" पण नीलू, बंगला बांधायचा मी म्हणालों तें काम इतक्या लवकर कसं होईल ? आमचं राहतं घर विकायला मला काय अधिकार आहे ? तूंच विचार कर. माझे वडील असल्या गोष्टीला एकदम कसे परवानगी देतील ? "

" मग काय म्हातारपणीं बंगला बांधायचा वाटतं—! " नीला थोडीशी फुरंगटून म्हणाली

" तूं विपरीत अर्थ घेऊं नकोस.मी म्हटलं सवडी सवडीनं सगळ्या गोष्टी आपण करूं. अन् खरं सांगायचं तर आईला वाटतं कीं तूं आमच्या घरांत राहावंस. तिला कित्ती तुझं कौतुक वाटतं बघ. ती तर रोज सारखं म्हणत असते— "

" हे पहा, प्रभाकर. हा विवाह तुमचा आणि माझा आहे. यांत आपल्या आईवडिलांचा संबंध आणणं बरोबर नाहीं-- "

" बरं बुवा ! आपलं सांगून पाहिलं तुला ! "

" पण प्रभाकर तूंच सांग. एकत्र कुटुंब पद्धतीनं राह्यचं तर मग त्याला प्रीतिविवाह कशाला पाहिजे ? माझंच चुकलं. तूं पहिल्या दिवशीं गोंडा घोळीत माझी ओळख काढायला आलास त्याच दिवशीं मी तुला चमकावला असतां म्हणजे हा प्रश्नच आज उभा राहिला नसता--"

प्रभाकर नंतर एक अक्षर बोलला नाहीं. नीलेनें आपली लहर शेवटास नेली. कायदेशीरपणानें रजिस्टर कचेरींत त्यांचें लग्न लागलें--

--आणि त्यांनीं एकजुटीनें प्रवासाला प्रारंभ केला !

मात्र तो प्रवास त्यांच्या अपेक्षेप्रमाणें सुखाचा झाला नाहीं हें निश्चित. बंगला बांधण्याची प्रभाकरची कल्पना आणि तो मनाप्रमाणें सजविण्याची नीलाची कल्पना मूर्त स्वरूपांत येऊं शकली नाहीं. कशी येणार ? मुलगा रजिस्टर पद्धतीनें विवाह करावयास निघतो हें पाहून वडिलांनीं डोक्यांत राख कां घालून घेऊं नये? आईनें रडून रडून डोळे मुठी एवढे कां सुजवून घेऊं नयेत ? अगदीं तुटेपर्यंत तो प्रकार ताणला गेला. शेवटीं नीलेच्या वडिलांच्या कानावर या गोष्टी गेल्या ते मधें पडले. त्यांनीं मुद्दाम प्रभाकरच्या घरीं येऊन त्याच्या आई वडिलाना एक तासभर कांहींतरी एकीकडे नेऊन समजावून सांगितलें म्हणून लग्न तरी झालें. वडिलधाऱ्या माणसांनीं प्रभाकर आणि नीला यांना विवाहानंतर एक पैशाचीही मदत करण्याचें सपशेल नाकारलें. त्यांनीं स्वतंत्र बिऱ्हाड करावें, स्वतः मिळवावें व स्वतः आपल्या कष्टार्जित धनाचा स्वतःच्या मनाप्रमाणें व्यय करावा हें नीलेला पटलें आणि नंतर अर्थात् प्रभाकरलाही पटलेसें दिसलें. नीलेनें प्रभाकरला धीर देण्यासाटीं हंसून म्हटलें, " बरोबर आहे ह्यांचं म्हणणं. अन् मी म्हणतें दुसऱ्याच्या जिवावर आपण तरी कां उड्या माराव्या ? तूं शिकलेला आहेस, मी शिकलेली आहे. आपण दोघेही नव्या पिढीचे प्रतिनिधि आहोंत. त्यांतून आपण कांहींतरी विशेष करतों आहोंत हें कसं विसरून चालेल ? आपला हा प्रीतिविवाह आहे आणि तोसुद्धां नोंदणी

पद्धतीचा आहे. आपण जगाला पटवून दिलं पाहिजे कीं--" प्रभाकरानें कपाळावरून हात फिरवीत संमतीदर्शक हास्य केलें.

त्यामुळें तूर्त तरी बंगल्याचा विचार त्यांना दृष्टीआड करावा लागला. परंतु एवढ्याशा क्षुल्लक गोष्टीनें त्यांच्या जीवनौघांत काय गढुळपणा निर्माण होणार होता ? मुळींच नाहीं. आईवडिलांनी थोडीफार सुरवातीची मदत म्हणून दिलेली पैशाची थैली जोपर्यंत जड लागत होती तोंपर्यंत त्यांच्या सुखांत कसलीच कमतरता पडली नाहीं. दोघेही पूर्व संकेतानुसार मुंबईला एक महिनाभर एका मित्राच्या घरीं जाऊन राहिले. मित्रमंडळींनी त्यांच्या या साहसाबद्दल त्यांचें मनसोक्त कौतुक केलें. या मित्रांनी त्या मित्रांना सांगितले " प्रीति-विवाह बरं का—अन् तो सुद्धां हळदीच्या बोहोल्यावरचा नाहीं. सरकारी कचेरींतला. " त्या मित्रानी दुसऱ्या मित्रांना सांगितलें. दादरच्या मंडळींनीं त्याचें अभिनंदन केलें, गिरगांवांतल्या स्नेह्यांनी त्यांना भरघोस फुलांचा हार अर्पण केला. पुण्याला त्यांच्या कॉलेजांतील मित्रांनीं त्यांना कॉलेजमध्यें बोलावून त्यांचा जाहीर सन्मान केला. आणि पुण्या-मुंबईचीं वर्तमानपत्रें या दंपतीच्या फोटोंनी अलंकृत केलीं गेलीं.

प्रत्येक सत्कार समारंभाहून घरीं परत आल्यावर एकांतांत नीला अभिमानानें आपल्या प्रभाकरकडे पाही. आणि प्रभाकर कोण आवेशानें तिला जवळ ओढून 'तुझ्यामुळें मला हें देवपण आलं आहे' म्हणून तिला वारंवार बजावी. दोघांच्या मानसिक सुखांत आतां अपूर्णता कशाचीही राहिली नव्हती. आपण जन्माला येऊन जुने पाश, जुन्या चालीरीति, जुने संस्कार तोडून टाकल्या-बद्दल त्यांना कमालीचा अभिमान वाटत होता. जों जों स्तुतीचे शब्द त्यांच्या कानावर पडूं लागत तों तों त्यांना आपण काहींतरी अचाट, असा-मान्य करून दाखवलं आहे असें वाटूं लागे. त्यांच्या स्वतंत्र जीवनाला सुरुवात तर फारच छान झाली. ती तशी टिकलीही असती परंतु जग फार वाईट आहे. जगाला व्यक्तीचें सुख पाहवत नाहीं म्हणून म्हणतात तेंच खरें !

नुसत्या गोड गोड शब्दांवर आणि दिवसांतून कमींत कमी साठ सत्तर वेळां परस्परांना दिलेल्या प्रेमाच्या शाब्दिक आश्वासनावर संसार उभे राहूं शकत नाहीं. हा अनुभव त्यांना जोंपर्यंत नव्हता तोंपर्यंत सर्व कांहीं सुरळीत

चाललें होतें. परंतु नवीन अनुभवाची झळ लागतांक्षणींच नीला प्रथम थोडीशी गांगरल्यासारखी झाली. नवीन अनुभवाला सुरवात तरी पहा कशी अचानक झ ली ती—

नीला आपल्या एका श्रीमंत मैत्रिणीकडे प्रभाकरला घेऊन जेवावयाला गेली होती. तिथें कुणीतरी बोलतां बोलतां सहज प्रश्न केला,

" तुमचं घरचं उत्पन्न वगैरे कांहीं आहे वाटतं ? "

" माझे वडील कॉन्ट्रॅक्टर आहेत. अन् आमचं वडिलोपार्जित घर आहे. पण मी आणि नीला आम्ही दोघांनी ठरवलं आहे कीं वडिलांच्या पैशाची आशा ठेवायची नाहीं. वडिलांच्या पैशावर जर आम्ही स्वतःला विकून घेऊं लागलों तर मग आमच्या मतस्वातंत्र्याची गळचेपी झाल्या-शिवाय राहील होय ? "

प्रभाकरनें बाणेदारपणानें दिलेलें हें उत्तर ऐकून तेथें जमलेल्या स्त्री-वर्गानें आपलें दीड वीत लांबी रुंदीचे टीचभर रुमाल हवेंत उडवून त्याचें भरपूर कौतुक केलें परंतु ज्या गृहस्थानें तो प्रश्न टाकला होता त्याचें तित-केंसें समाधान झालेसें दिसलें नाहीं. नीलेची मैत्रीण मोठ्या आवेशानें त्या गृहस्थाला छेडण्याच्या हेतूनें म्हणाली, " कां ? तुम्हांला माझ्या मैत्रीणीच्या या बेताबद्दल कांहींच अभिनंदनपर बोलावेसें वाटत नाहीं ? कां तुमची एक जिरली म्हणजे सारं जग असंच तुमच्यासारखं पराभूत मनोवृत्तीचं असतं अशी तुमची खात्री आहे कीं काय ! "

" नाहीं. रागावूं नका. तुमच्या मैत्रीणीची मी जाहीर स्तुति करतों. त्यांचीं अन् त्यांच्या भागीदाराची ही तयारी खरोखरीच कौतुकास्पद आहे पण मला वाटतं ही धडाडी उद्यांपर्यंत टिकेल कीं नाहीं हें निश्चित सांगतां येणार नाहीं—" तो गृहस्थ जपून बोलत होता.

" कां ? कां टिकूं नये ? दोघेही शिकलेले आहेत. कुठेही नोकरी करून पोटं भरण्याची त्यांना हिंमत आहे. " नीलेची मैत्रीण आव्हानात्मक सुरांत म्हणाली. " तें ठीक आहे हो ! जगांत नुसतीं पोटें भरण्याचीच इच्छा असती तर सगळेच वाद आगम्यागीं सुटले असते. पण मला वाटतं पोट भरण्याच्या कल्पनेपेक्षा आणखी कांहींतरी जास्त माणसाला हव असतं. आणि तें त्याला मिळालं नाहीं म्हणजे त्यांच्यांतला सैतान जागा होतो—"

" कांहींतरी म्हाताऱ्या आजीबाईसारखं बोलतां आहांत झालं. तुमची स्वत:ची दैना उडाली म्हणून तुम्ही पोळलेले आहांत—"

" माझा अपजय मी तोंडानं कबूल करतों. मीही असाच दुसऱ्याच्या कपर्दिकेला न शिवण्याची शपथ घेऊन वडिलांपासून दूर झालों होतों हें खरें आहे. परंतु पत्नीनें एक, दोन, तीन मुलांना जन्म देईपर्यंत मी त्रास सहन केला. शेवटीं मुकाट्यानें ........ शरण गेलों. जगाला माहीत आहे हें आणि म्हणूनच मी अधिकार वाणीनं असं म्हणेन कीं तरुणांजवळ भरपूर आवेश आहे पण त्याच्याजवळ अनुभव नाहीं. तो अनुभव एकदां आला कीं आवेश लटपटतो—पण प्रभाकर, तुम्हाला तुमच्या आयुष्यांत चांगले अनुभव यावेत अशीच माझी मनापासून इच्छा आहे बरं का—"

प्रभाकर त्यावेळीं कांहींच बोलला नाहीं. नीलेच्या मैत्रिणीनें दिलेल्या मोटारींतून परत येत असतां तो वाटेनें विचार करीत होता. त्या गृहस्थाचें म्हणणें त्याला कळकळीचें वाटलें. प्रामाणिकपणा तर त्याच्या भाषणांत पुरेपूर होता यांत शंकाच नाहीं. खरंच, त्या गृहस्थाच्या म्हणण्याप्रमाणें आपली—! आणि तो तंद्रींतून जागा झाला ! नीलेनें त्याला डिवचलें होतें.

" विचार कसला करतां ? बोलावसं वाटत नाही कां आज ? " तोंडाचा चंबू करून नीला लाडिकपणानें त्यांच्याशीं बोलत होती.

प्रभाकरनें उडवाउडवीचें उत्तर देऊन ती वेळ कशी तरी भागवून नेली. परंतु रात्रीं अंधारांत पुन्हां त्याचें डोकें भ्रमण करूं लागलें. कालच नीलेच्या आग्रहावरून त्यानें तिच्यासाठीं तीन जॉर्जेटचीं पातळें खरीदलीं होतीं. इंग्लिश सॅटिनचें पंधरा सोळा वार कापड तिच्या ब्लाऊझकरितां त्यानें घरीं आणलें होतें. सकाळीं स्टो पेटवण्याचा त्रास नको म्हणून विजेची शेगडी त्यानें आणली होती. नीलेच्या मनपसंतीनुरुप त्यानें गेल्या महिन्यांत जवळ जवळ सहाशे सातशेचा माल या ना त्या प्रकारचा विकत घेतला होता. वडिलांनीं दिलेल्या पैशाचें पाणी होऊं लागलें होतें. आज मोडलेली शंभराची नोट उद्यांला कांहीं त्याच्या हातांत शिल्लक राहात नव्हती. आणि अजून कशाचा कशाला पत्ताही नव्हता !

हें असं चालणार तरी किती दिवस? अनुभव! खरंच, यालाच तो गृहस्थ अनुभव म्हणून म्हणत होता काय?

नीलेच्या बाजूनें जागरुकतेची चिन्हें दिसूं लागलीं. दमल्याप्रमाणें एक दीर्घ निश्वास सोडून नीला त्याच्या कुशींत तोंड खुपसून गुदमरलेल्या आवाजांत म्हणाली, " खरंच, आतां तुम्हांला उद्यांपासून नोकरीचं पहावं लागेल, नाहीं?" प्रभाकर या प्रश्नाने एकदम दचकल्यासारखा झाला.

" नोकरी? होय—म्हणजे—आपलं तूं अन् मी दोघेही उद्यापासून अर्ज खरडायला सुरवात करूंच. " तो चाचरत चाचरत म्हणाला.

" मी? मी कशाला नोकरी करूं? मी नोकरी करायला लागलें तर तें लोकांत बरं दिसेल का? लोक चटकन् म्हणतील कीं पहा हा प्रीतिविवाह. दोघेही नोकरी करून पोट भरताहेत अन् म्हणे आमचा प्रीतिविवाह! छें: गडे! माझ्या शिक्षणाचा असा दुरुपयोग करणं मला नाहीं आवडत स्त्रियांच्या शिक्षणाचा उपयोग पैसे मिळविण्याकडे कसला करायचा? त्यापेक्षां समाजसेवा, साक्षरता प्रसार असल्या गोष्टी आम्ही शिकलेल्या बायकांनीं केल्या तर बरं नाहीं का दिसायचं? आपली स्वयंपाकाची बाई आहे ना, तिलाच मी उद्यांपासून शिकवायला सुरवात—" नीला म्हणाली.

प्रभाकर एक अक्षर बोलला नाहीं. तो नवीन नवीन अनुभव घेण्याचें कार्य करीत होता :

—आणि त्यानें थोडक्याच दिवसांत खूप अनुभव जमा केले. पहिला अनुभव म्हणजे हा कीं नोकरी मागणें फार सोपें असतें परंतु ती मिळणें तितकेंच कठीण असतें. आजच्या जगांत बी. ए. पेक्षां मोरी उपसणारा होणं फार सोईचं आहे. नोकरी शोधून शोधून तो कंटाळला. शेवटीं सध्यांच्या काळांत युद्धोपयोगी कारखाने पुष्कळ निघाले आहेत तिकडे खटपट करण्याचा मनोदय त्यानें नीलेला बोलून दाखवला. परंतु फॅक्टरींत काम म्हणजे सकाळीं सात ते संध्याकाळीं सात असा हा बारा तासाचा हिसका नीलेला पसंत पडला नाहीं म्हणून तो विचार त्याला रद्द करावा लागला. शोध करतां करतां एका शाळेंतला एक शिक्षक शिक्षकाची नोकरी सोडून फॅक्टरींत लागला होता. त्याची जागा त्याला मोठ्या मिनतवारीनें मिळाली परंतु पन्नास रुपये पगार आणि पांच रुपये महागाई भत्ता

एवढ्यांत त्याचें जमणार तरी कसें ? प्रभाकरनें ही नोकरी आतां मात्र नीलेच्या पसंतीची वाट न पाहतां पटकन धरून ठेवली. नीलेला अर्थात् प्रभाकरनें 'मास्तरडा' होणं तितकंस रुचलं नाहीं.

——आणि त्यांच्या झटापटीला हळूहळू सुरवात झाली. प्रभाकरला आतां दुसरा अनुभव मिळूं लागला. सुशिक्षित पत्नीबरोबर हिंडायला ठीक असतें बोलायला मिष्टास भासतें, एरव्ही सहचर्याला चांगली असते परंतु ससाराला काडी किंमतीची असते; हा अनुभव त्याला मिळाला. नीला त्याच्याशीं गोडगोड बोले परंतु अनेक तक्रारींचा भरपूर साठा तिच्याजवळ केव्हांही तयार असे. स्वयंपाकीण बाईशीं तिचें कधींच पटलें नाहीं. मोलकरीण चोरटी असल्याच्या सबबीवरून तिनें आजपर्यंत चार महिन्यांत सोळा बायका कामावरून हाकलल्या होत्या. तिला अनेक जिनसा पाहिजे होत्या. दुपारीं प्रभाकर मेंढरें राखायला गेला म्हणजे घरीं वेळ जायला म्हणून एकादा रेडीयो मिळाला तर तिला पाहिजेच होता. या ना त्या कारणासाठीं तिला पैशाची अत्यंत जरूरी लागे. तो पैसा पुरवणं प्रभाकरवर येऊन पडलें होतें. आणि पचावन्न रुपयांत हें सगळं उरकणं त्याला शक्य नव्हतं. —आणि त्यामुळें तो वारंवार क्षुल्लक कारणांवरून विनाकारण चिडाचीड करण्याचें शिकूं लागला. तिसरा अनुभव त्याला लवकरच मिळाला. पैसा जवळ आहे तोंपर्यंत प्रेमाची भाषा ठीक असते. पैसा फिरला कीं पत्नीचें डोकें फिरलेंच म्हणून समजावें.

दोघांचेही डोळे उघडूं लागले. आपण जें कांहीं अघटित म्हणून केलें आहे त्यांत अघटितपणाचा यत्किंचित भाग नसून मूर्खपणाचाच भाग भरपूर आहे हें दोघांनाही कळून चुकलें. प्रीतिविवाह आणि नोंदणी पद्धतीनें लग्न या गोष्टी केल्या म्हणजे माणसाचा कांहीं देवगंधर्व बनत नाहीं हा शोध त्यांना लवकरच लागला. नीलेला आपला मूर्खपणा कळून आला. आपण काय मनोरे बांधले होते आणि आज प्रत्यक्ष आपण काय पाहात आहों हें पाहून तिला अतोनात वाईट वाटूं लागलें. प्रभाकर विषयीं तिला तिरस्कार वाटत नव्हता हें खरें परंतु त्याच्यासहवासात आपण सुखी होऊं शकणार नाहीं हें तिला स्पष्ट कळून चुकलें. प्रभाकरनें जिवाचा कितीही आटापीट केला तरी या जन्मांत त्याला बंगला बांधतां येणें शक्य नाहीं

आणि आपल्या मैत्रिणीप्रमाणें मोटारही विकत घेतां येणें शक्य नाहीं हें स्पष्ट दिसत होतें. आणि एका मास्तरची बायको या अपमानास्पद रीतीनें उभें आयुष्य वायां घालवणें तिला भयंकर वाटूं लागलें. आणि अशाच विचाराच्या तंद्रींत असतां एके दिवशीं तिचा स्वयंपाकीण बाईशीं जोराचा खटका उडाला. कारण कांहींच नव्हतें. होतें तें अगदींच सामान्य होतें. प्रभाकर जेवून शाळेंत गेला होता. नीला जेवण्यासाठीं पाटावर येऊन बसली. बाईनें पोळी पानात वाढली. आणि नीलेनें ताट भिरकावून दिलें.

"तुमचं डोक हल्लीं ठिकाणावर असतं का? तुम्हाला लाख वेळां सांगितलं कीं, मला मेणचट तूप वाढलेलं मुळींच आवडत नाहीं आणि तुम्ही मुद्दाम माझा अपमान करण्याकरतां तेंच तेंच पुन्हां वाढतां?" नीला संतापानें ओरडली. बाईनीं प्रथम परोपरीनें तिची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. चार वेळां सांगून सुद्धां साजुक तूप अजून प्रभाकरपंतांनी आणून न दिल्याचें तिनें तिच्या दृष्टोत्पत्तीस आणून दिलें तरी नीलाचा राग शांत होईना. शेवटीं ती चार घरें फिरलेली बाईही पण अवसानांत आली.

"हें पहा. तुमच्या इथं मी आज नव्यानं स्वयंपाक करायला राहिलें नाहीं. उगीच मला सतावूं नका. कुणाचा अपराध अन् कुणाला हो तुम्ही तोंड टाकून बोलतां? माझा दोन महिन्याचा पगारसुद्धां तुम्ही अजून दिला नाहींत. एवढी साजुक तुपाविना पोळी न मिळण्याची ऐट मारतां तर मग माझ्यासारख्या गरिबाचे दोन महिन्याचे पगार कशाला थकवतां?"

बाई त्या दिवशीं न जेवतांच निघून गेली. पहिल्या तारखेला पैसे मिळाले पाहिजेत ही जातां जातां तिनें ताकीदही देऊन ठेवली. ही शेवटची काडी होती. हिनेंच नीलाचें सारें धैर्य खचवलें, दुपारीं नीला स्वतःशीच विचार करीत होती.

—संध्याकाळीं नित्याप्रमाणें कपाळावर आठ्या चढवून प्रभाकर घरीं परत आला तों त्याला आश्चर्याचा झटका बसला. दाराला कुलूप पाहून तो थक्कच झाला. पुन्हां बाहेर जाण्याकरतां तो माघारा वळणार तोंच शेजारच्या ब्लॉकमध्यें राहणाऱ्या एका पोरानें त्याला कुलपाची किल्ली आणून दिली. आश्चर्यानें प्रभाकरनें कुलूप काढलें. तो आंत गेला आणि दुसरा एक

आश्चर्याचा झटका त्याला बसला. घरानील सामानाची भूकंपांत सांपडल्या-प्रमाणें उलथापालथ झालेली त्याला दिसून आली. आणि त्या सामानांत नीलेच्या दोन कातडी बॅगा अजिबात बेपत्ता होत्या. काय झालें असेल याचा तो तर्क करीत उभा होता तोंच टेबलावर एक पत्र ठेवलेलें त्याला आढळून आलें. पत्नीचें हस्ताक्षर त्यानें ओळखलें. पत्र घाईघाईनें फोडून तो वाचूं लागला—

" ...आणि म्हणून मीं माहेरीं जात आहें. आपलें दोघांचें एकत्र राहणें शक्य नाहीं. माझ्या साऱ्या सुखस्वप्नांचा चक्काचूर झालेला मला सहन करवत नाहीं. आपले दोघांचें रजिस्टर पद्धतीनें लग्न झालें आहे. दचकूं नका. लग्न मोडावें असें मी मुळीच म्हणत नाहीं. परंतु कांहीं काळ तरी आपण एकमेकांना न भेटावें हें उत्तम. माझ्या मनाला बसलेला धक्का मला विसरायला किती दिवस, किती महिने लागतील हें आजच सांगतां येत नाहीं. आपलें बिऱ्हाड तूर्त तरी मोडावें असें मला वाटतें. आपला विचार जसा ठरेल त्याप्रमाणें करावें ......"

—आणि एक विचित्र अनुभव त्याला आत्तांच मिळाला! पत्नी माहेरीं गेली आहे हें पाहून त्याला चक्क आनंद वाटला! तळहातावर उगवलेली पुटकळी नाहींशीं झालेली पाहतांच माणसाला जसा हर्ष होतो तसा हर्ष त्याला यावेळीं झाला—

आणि—आणि काय सांगायचें कपाळ! चार दिवसांनीं तो वडिलांच्या घरांत गेला. बिऱ्हाड मोडलें, सामान वडिलांच्या घरात आणलें. त्याच्या आईला कोण आनंद झाला! वडिलांनी मात्र त्याला एका शब्दानें खुलासा विचारला नाहीं.

आठ दिवस गेल्यानंतर नववे दिवशीं सकाळीं बाबासाहेब नीलेला मोटारींत घालून आलेलें प्रभाकरनें पाहिलें. नीला खालीं मान घालून घरांत आली. तिनें प्रभाकराकडे पाहिलें सुद्धां नाहीं. बाबासाहेबांनीं खाकरून सूचना करतांच ती मुकाट्यानें सासूसासऱ्यांच्या पाया पडली.

"प्रभाकरपंत, नीला—आतां तुमचा संसार याच घरांत चालावा हें उत्तम. तुम्हांला जगाचा अनुभव येऊं द्यावा म्हणूनच आम्हीं तुमच्याशीं कठोर-

पणानें वागलों. तुम्हाला मुद्दामच आम्हीं घराबाहेर ठेवलें, आमची खात्री होती कीं तुम्हांला पश्चाताप झाल्याशिवाय राह्यचा नाहीं."

प्रभाकर व नीला खालीं माना घालून ऐकत उभे होते. बाबासाहेब एकवार मोठ्यानें हंसून म्हणाले, "अरे त्यांत एवढं वाईट वाटून घेण्या-जोगं काय आहे? चालायचंच! तरुणांनीं चुका करायच्या हें ठरलेलच आहे. असे नाउमेद होऊं नका. अजून सबंध आयुष्य पुढेंच आहे. फक्त आम्हीं रजिस्टर पद्धतीनें आमचा प्रीति विवाह साजरा केला म्हणजे कांहीं जग-विरहीत पराक्रम करून दाखवला ही कल्पना प्रथम सोडून द्या. लग्न कोण-त्याही पद्धतीनें झाली तरी ती यशस्वी करून दाखवायची तर त्याला परस्पर सहानूभूती असल्या खेरीज शक्य नाहीं. आतां आम्हा म्हाताऱ्यांचे संसार पहा नं. प्रभाकर, तुझ्याच आई वडिलांना तूं विचार बरं."

"माझी सून काहीं तशी समजूतदार नाहीं असं नका हं समजूं—" प्रभाकराची आई अभिमानानें नीलेला जवळ ओढीत म्हणाली.

"अन् माझा जांवई काय कमी समजूतदार आहे होय?" बाबासाहेब प्रभाकराकडे पहात हसून म्हणाले.

---

## उलटलेली गोगलगाय : : ४

गोगलगाईची उपमा ज्या स्त्री जातीला बहाल करण्यामध्यें आपण आनंद मानतों ती स्त्री पुरुषावर उलटणें हा आपला धर्म असल्याचें धरून चालत असते. परंतु खरोखरीची गोगलगाय उलटलेली कुणी पाहिली आहे काय? ज्यांना अजूनपर्यंत त्या प्राण्याचें हें निर्वाणीचें वागणें पहावयास मिळालें नसेल त्यानें काशिनाथची गोष्ट सावधान चित्तानें ऐकावी म्हणजे सारें कांहीं नीटपणें कळून येईल.

काशिनाथनें वडिलांच्या पश्चात् चारदोन मुली पाहिल्या आणि त्यांतल्या त्यांत जी बरी दिसली तिला गृहस्वामिनीच्या पदावर विराजमान केलें. स्टेशनरी सामान विकणाऱ्या गृहस्थाच्या पत्नीबाबत विशेष त्या काय अपेक्षा असणार! नितंबापर्यंत स्वैर रुळणारा केशसंभार वाहणारी स्त्री त्याला कामिनिया ऑईलच्या जाहिरातींतच फक्त पाहायला मिळायची. 'हे पहा शुभ्र दांत' विचकून दाखवणारी अप्सरा त्याला टूथपेस्टच्या जाहिरांतींतच पाहायला सांपडायची. नितळ त्वचेची बाई त्यानें फक्त 'नको असलेले केस मी व्हीट लावून नाहींसे करतें' म्हणून निर्लज्जपणानें खाका वर करून दाखवणाऱ्या एका बाईच्या चित्रांतच पाहिली होती. कुरळे केस, दाभणाच्या टोकाप्रमाणें निमुळती होत जाणारी हातपायांचीं बोटें, इंद्रधनुष्याच्या तोंडांत मारण्यासारख्या रेखीव भुवया इत्यादि सौंदर्यवर्धक लक्षणें त्यानें

दुरूनच न्याहळून पाहिलीं होतीं. त्याला यांतील कांहींएक आवडत नव्हतें असें नाहीं, परंतु वडाराच्या पोरानें कोठवर उडी मारावी हें व्यवहारज्ञान त्याला होतें म्हणूनच सांगलींतली एक पोरगी त्यानें बिनतक्रार मान्य केली. सौंदर्याच्या बाबतींत फारसा काटेकोरपणा दाखविण्याचें त्याच्या मनांत सुद्धां आलें नाहीं.

—आणि आश्चर्याची गोष्ट कीं, शरयूंतसुद्धां हंमखास सौन्दर्य जरी नाहीं तरी छातींत कसेसेंच व्हायला लागण्याइतपत कांहींतरी आकर्षक भाग आहे हा त्याला थोड्याच दिवसांत शोध लागला. शरयूचें कपाळ रुंद होतें, डोळे सामान्य होते, कानाचीं पाळीं इतर बायकांसारखीं होतीं, नाकाचा उंचवटा बरा होता परंतु काशिनाथाला आपली बायको फाकडू आहे असें वाटावयास लावलें तें तिच्या ओष्ठद्वयानीं. खालचा ओठ किती सुंदर होता! ह्या टोंकापासून ते त्या टोंकापर्यंत पसरलेला तो भरगच्च ओठ निर्माण करण्यांत विधाता अचानकपणें आपलें खरें कौशल्य खर्च करून गेला होता. आणि मधोमध छेद देणारी एक उभी रेषा तरी किती रेंखीवपणानें आव्हान देणारी होती! तिच्या ओठांतला जिवंत रसरशितपणा पाहून काशिनाथचें हृदय हरपून जात असे. आणि शरयू जेव्हां हसूं लागे, आणि जेव्हां तिच्या ओठांच्या पाकळ्या विलग होत त्या वेळीं त्याला अगदीं वेड लागायची पाळी येई! या तिच्या एकाच सौंदर्यविशेषावर तो नितांत खूष होता!

शरयू प्रथम सासरीं आली तेव्हां तिनें खालची मान वर केली नाहीं. झेप टाकण्यापूर्वी मांजरी ज्याप्रमाणें भुईकडे पहात टिपण घेऊं पहाते त्याप्रमाणें शरयू अत्यंत नम्रपणानें पहिल्या खेपेस वागली. पांचसहा हजार रोख रुपये, एक लहानसें परंतु टुमदार मालकीचें घर, दोनतीन हजारांचे दागिने व बरें चाललेलें एक स्टेशनरी सामानाचें दुकान एवढ्या स्थावर जंगम इस्टेटीची ती एकुलती एक मालकीण होती. घरांत सासू नाहीं, सासरा नाहीं—एक काशिनाथ सोडून बाकी कुणीही तिला 'हें असं कां?' म्हणून जाब विचारणारें नव्हतें. आणि नवीनच लग्न झाल्यानंतर पत्नीला शिस्त लावावयास उत्सुक असणारे पति अजून जन्माला आलेले नाहींत. आपलें वैभव किती मोटें आहे, आपण किती चतुर आहोंत, यापुढें आपण काय पराक्रम करून दाखविण्याचें योजलें आहे इत्यादि फुशारकीच्या गोष्टी

पत्नीला सांगणारे वीर घरोघरीं आढळून येतात. काशिनाथनें पहिले दोन तीन महिने यांतच खर्च केले. हो! पण यांत त्याचा बिचाऱ्याचा दोष मुळींच नव्हता हें आधीं स्पष्ट केलें पाहिजे. लहानपणीं आईचा सहवास दूरावलेला, पुढें चार वर्षांपूर्वी वडिलांनीं आपली पाखर काढून घेतलेली; घरामध्यें मायेचं असं स्त्री पुरुषांपैकीं कोणीहि शिल्लक राहिलेलं नाहीं; अशा स्थितींत गेलीं तीनचार वर्षें त्यानें खानावळींत जेवून आपलें एकाकीं जीवन जगवलें होतें. धंद्यांत बरकत आली तरी आनंदानें कौतुक करायला त्याचं कुणीही नव्हतं. एखाद्या वेळीं दोन आणे खरेदीचे वोरूं सहा पैशाला विकल्यामुळें दोन पैशांची नुकसानी सोसावी लागल्याची चुटपुट त्यानें कुणाजवळ व्यक्त करावी? अशा या धर्मशाळेंतल्या भणंग आयुष्यात त्याला शरयू येऊन मिळाली—थोडासा वागण्यांत सैलपणा जर प्रथम दिसून आला तर त्याला दोषी म्हणावं तरी कसं?

काशिनाथनें शरयूचें भरपूर कौतुक केलें. पत्नीवर अमर्याद प्रेम असलें तरी तिच्यावांचून आपलें अडेल हें स्पष्टपणें कबूल करणारा पुरुष अकलेचें गाठोडें गांवच्या नदींत बुडवून आल्यासारखा असतो हें सत्य आहे. पत्नी-वांचून कोणत्याही पतीचें अडणारच. परंतु तें तिच्याजवळ कबूल करणारा मनुष्य गाढव असतो. नसला तर थोड्याच दिवसांत ठरतो हें नक्की. तरुण पिढीचें जर कुठें चुकत असेल तर याच ठिकाणीं चुकतें. पत्नीवर माणसानें प्रेम करूं नये असें नाहीं. अवश्य प्रेम करावें. वाटल्यास थोडेसें जाहीर प्रदर्शनही करावें परंतु आपण सर्वस्वी तिच्या आहारीं गेलों आहोंत असें तिला वाटूं देऊं नये. एकदां तिनें पतीला पूर्णपणें जोखलें, कीं पती गाढव ठरला म्हणून समजावें.

पहिल्याच खेपेस काशिनाथनें तिच्या आहारीं जाण्यास सुरुवात केली. आचरटासारखा तो तिला म्हणाला, 'आतां तूंच ह्या घराची मालकीण आहेस. तुझ्या म्हणण्याप्रमाणें या घरांतील सजीव निर्जीव वस्तु वागूं लागतील. तूं म्हणालीस कीं 'ए वाऱ्या वाहूं नकोस' वारा वाहणार नाहीं. तूं म्हणालीस कीं, 'काशिनाथ, आज दुकानांत जाऊं नकोस' काशिनाथ म्हणणार 'जी हुजूर, राणी सरकार." आणि तो मोठ्यानें हंसला. शरयूनें त्याच्या तोंडाकडे पाहून भांबावल्यागत अर्धवट हास्य केलें. काशिनाथला

एकदम स्फुरण चढलें आणि तो अवसानांत पुढें बोलूं लागला, 'शरयू, तूं आतां माझी झाली आहेस. अन् मी तुझा आहें. आपण दोघेजण एकमेकांचे आहोंत. आतां आपण एकमेकांपासून एक अक्षरसुद्धां दडवून ठेवायचं नाहीं हं. तूं मला कां आवडतेस अन् मी तुला कां आवडतो हें मला सांगायचं, बरं का–हो! पण मी तुला आवडतों का?'

हा असला प्रश्न नूतन विवाहित पत्नीला कोणत्याहि पतीनें विचारणें वास्तविक मूर्खपणाचें आहे. पण काशिनाथ आतां थांबणारा गडी नव्हता. ह्या प्रश्नाला बिचारीं शरयू काय उत्तर करणार! तिनें हलकेंच काशिनाथच्या डोळ्याकडे निरखून पाहिलें व लाजून 'इश्श!' म्हणून म्हटलें.

'यंवरे पठ्ठे! म्हणजे मी तुला आवडतों. तूं मला कां आवडतेस सांगूं? तुझे ते ओठ आहेत नं ते मोठ्ठे गोड आहेत. सांगलीहून येतांना तूं त्याच ओठांनीं महाबळेश्वरचा मध पिऊन आली होतीस वाटतं? आतां सांग, मी तुला कां आवडतो तें?'

'इश्श! कांहींतरी काय बोलतां!' दांताआड ओठ लपवून शरयू गोंधळलेल्या मुद्रेनें म्हणाली.

—हा असा काशिनाथ होता! आणि पहिल्या भेटींत वरवर दिसणारी शरयूही अशी होती!

—लग्नाला एक वर्ष होऊन गेलें. पहिलें वर्ष धुंदींतच जातें. त्याला इलाज नाहीं. आफ्रिका खंडांतील कॉंगो नदीच्या काठचा मुलूख हुडकून काढणें सोपें ठरेल परंतु स्त्रीच्या मनाचा ठाव लागणें कठीण आहे. आणि पहिल्या वर्षी तर मध पिण्याच्या मागें लागलेल्या भुंग्यानें हा शोध लावण्याचा प्रयत्न करावा हें शक्य नाहीं. शरयू आतां पूर्वीसारखी मुग्धबाला राहिली नव्हती. काशिनाथला गुंडाळून कसें घ्यावें हें ती अचूक ओळखत होती. दिवाळीनंतर ती सासरीं आली तेव्हां तिनें माहेरून येतांना एक धाकटा भाऊ व एक छोटी बहीण आणली.

'दोघांत तिसरें कशाला?' काशिनाथनें रात्रीं तिला प्रश्न केला.

'पण यापुढें आपण जन्मभर दोघेच कां राहणार आहोंत?' शरयूनें उलट प्रश्न केला.

'तें निराळं. पण मी म्हणतों भावाला अन् बहिणीला कशाला घेऊन आलीस ? नसती जबाबदारी-'

'म्हणजे माझीं माणसं तुम्हांला नकोत वाटतं ? इकडे घरांत कुत्रंसुद्धां भुंकायला नाहीं म्हणून दुपारीं तुम्ही दुकानावर गेलात तर करमणुकीसाठीं मी आपल्या भावंडांना घेऊन आलें तरी यांत काय बिघडलं ? अन्नवस्त्राची अडचण वाटत असेल तर मी बाबांच्याजवळून कांहीं तरी मागून घेईन बरें. माणसं जड वाटायला लागलीं हें मी नव्यानंच ऐकतें आहे !' शरयू बोलतां बोलतां अंथरूण झुगारून देऊन उठून बसली.

'झालं. मी म्हटलं एक अन् तुला वाटलं दुसरंच. तसं मी म्हणत नाहीं. मला भावंडं असतीं तर मी काय त्यांना हाकलून देणार होतों थोडाच ! पण म्हटलं तीं मुलं असलीं घरांत म्हणजे जरा मोकळं ढाकळं वागायला आपल्याला अडचण नाहीं कां होणार ?'

'इश्श ! तुम्ही कसेंही वागलात म्हणून त्यांना काय करायचं आहे? ते काय तुम्हाला प्रेम करूं नका म्हणून म्हणतील होय ?'

'म्हणजे त्यांच्यादेखत तुला चालेल? मद्य पिणंसुद्धां ?' काशिनाथ तिला जवळ ओढून म्हणाला ?

'इश्श ! तसलं आतां नाहीं हं चालायचं. मुलांनीं जर तसलं कांहीं पाहिलं तर साऱ्या सांगली गांवांत तोंड काढायला मला जागा राहाणार नाहीं.'

'अन् म्हणूनच मी म्हणतों कीं, हें कसं जुळावं मग' काशिनाथ चिंतातूर मुद्रेनें म्हणाला.

'तें कांहीं नाहीं. आतां थिल्लरपणानं वागणं बंद केलं पाहिजे. पुढच्या महिन्यांत माझी आत्या येणार आहे. अन् माझे मिरजेचे काका सुद्धां आपल्या बायकोला घेऊन येणार आहेत. डिसेंबरच्या पुढें मिरजेला पाण्याचा भारी त्रास होतो अन् माझी काकू तर दमेकरी. यंदाचा उन्हाळा ते इथेंच काढणार आहेत. त्या सर्वांच्यादेखत कसं मर्यादशील वागलं पाहिजे कीं—' शरयू बोलत होती आणि काशिनाथ ऐकत होता. तिला अडविण्याचें त्याला धैर्य होईना. शरयूच्या घरची मंडळी येणार हें ऐकतांक्षणींच त्याचें धाबें दणाणलें. परंतु पत्नीला मोडून काढण्याचें त्याला धैर्य

झालें नाहीं. आणि लग्नानंतर एक वर्षानें पहिल्याच दिवशीं तो शरयूशीं तितकासा गोडींत गोडींत बोलण्याचें विसरून गेला.

मे महिन्याचे सुमारास त्याचें घर लग्नघराप्रमाणें कसें नुसतें गजबजून गेलें. नवराबायकोंना आतां झोपायलासुद्धां जागा मिळेनाशी झाली. दिवसां एकमेकाशीं पूर्वीप्रमाणें गोडगोड भाषण तर दूरच परंतु नुसती नजरभेट होणेंसुद्धां गर्गाचार्यांच्या मुहूर्ताप्रमाणें घडूं लागलें. रात्रीं घरीं आल्यावर काशिनाथाला जेवण मिळणेंसुद्धां किती यातायातीचें काम होऊन बसलें. तो परत येई तेव्हां मुलांची पंगत उठून गेलेली असे आणि मोठ्या माणसांची पंगत नुकतीच बसलेली असे. रात्रीं अकरा वाजतां त्याचें जेवण उरकें आणि नंतर झोपण्यासाठीं म्हणून अंथरुण पांघरुणें शोधीत घरभर हिंडूं लागे. घराच्या बारा खोल्यांतून ढेकूण आणि माहेरचीं माणसें भिंतीला चिकटून पडलेलीं त्याला आढळून येत. एक सुद्धां खोली कांहीं अशी नव्हती कीं, तेथें नातलगाचा पोरवडा हजर नव्हता. शेवटीं गच्चीवर, नाहीं तर पत्र्यावर जेथें जागा सांपडे तेथें तो घोंगडी पसरून निद्रादेवीची आराधना करूं लागे. पडल्या पडल्या तो आकाशांतील तारे मोजीत विचार करूं लागे.

फ्लीटनें डास, पिसवा मारतां येतात. विषारी गोळीनें उंदीर खतम् करतां येतात. काठी आपटून मांजरें पळवून लावतां येतात. जपानी औषधाची पूड उडवून ढेंकूण पोंचट बनवतां येतात. पण आयतोबा माहेरचीं माणसं पळवून लावायला कोणी कसं अजून औषध शोधून काढलं नाहीं? मिरजेला पाण्याची हांकाटी म्हणून दोन लठ्ठ बोकोबा आणि तीन घुशी घरांत येऊन ठिय्या देऊन राहिल्या होत्या. सांगलींत मलेरिया फार म्हणून पुण्याला हवा पालटायला, अनुक्रमें ३२, २८ व २४ वयाचे तीन मेहुणे आलेले होते. एकूण पुरुष बारा आणि स्त्रिया सहा व लहान खुर्दा सुमारे डझन इतके जीव त्याच्या छपराखालीं आराम करीत होते. शरयूला सांगून या गोष्टींचा बंदोबस्त केला पाहिजे असें राहून राहून त्याला वाटत होतें पण तें जमावें कसें हा प्रश्न महत्त्वाचा होता. गेल्या महिन्यांत शरयू त्याला फक्त तीन वेळांच बोलण्यासारखी एकीकडे सांपडली होती. तीसुद्धां अशा ठिकाणीं कीं, त्या ठिकाणचें नांव उच्चारणें सभ्यपणाचें ठरणार नाहीं.

काशिनाथ आतां रोज सकाळीं लवकर उठूं लागला. बाहेर फिरायला जायचें निमित्त करून कुठल्यातरी हॉटेलांत चहा पिऊन तो परत घरीं येई. तोंपर्यंत घरांतली निम्मी माणसें उठलेलीं असत. कांहीं जण त्याच्याशीं बोलण्याइतकें सौजन्य दाखवीत—पण बोलणें हें असें:—

'काय काशिनाथपंत, हवा कशी काय आहे? काल रात्रीं झोप लागली नव्हती वाटतं?' पहिला मेहुणा वय वर्षे ३२.

'का आम्ही झोपलेलें पाहून कुठें गाण्याच्या मैफलीला पळालात ते आत्तां उगवतां आहांत?' दुसरा डिट्टो वय वर्षे २८.

'अरे हीं पुण्याचीं माणसं फार बिलंदर बरं का—ताईला सावध करून ठेवलं पाहिजे. नाहींतर यांच्या हजारों भानगडी असायच्या' तिसरे मेहुणे.

काशिनाथ त्यांच्याशीं एक अक्षर बोलत नसे. परंतु मनांतून असा संतापे कीं, विचारतां सोय नाहीं.

त्यानंतर अंघोळीस ऊन पाणी त्याला कधींच मिळालें नाहीं. जसें असेल तसें पाणी दोन तांबे डोक्यावर ओतून तो दुकानांत पळे. दुपारीं बारा वाजतां दुकान बंद करून तो जेवणासाठीं घरीं येई. त्यावेळीं घरांत पंगती उठत असत. दुपारीं कसेंबसें मिळेल तें अन्न पोटांत ढकलून तो दुकानांत पळे तो रात्रीं ९ ला घरीं येई! हा दिनक्रम गेले दोन महिने अबाधितपणें चालूं होता.

एके दिवशीं त्याला मंडळींनीं पुरतें घेरलें. रात्रीं जेवणें वगैरे उरकल्या-वर शरयू हलकेच पत्र्यावर तो पडला होता तेथें आली. शरयू आलेली पहातांच काशिनाथनें दचकून आजुबाजूला पाहिलें. शरयू त्यानें पसरलेल्या घोंगडीवर खुरमांड्या घालून बसली.

'दोन महिन्यांत आज तूं मला भेटलीस! मला वाटतं हें असंच चाललं तर कांहीं दिवसांनीं आपण आपलं नवराबायकोचं नातंसुद्धां विसरून जाऊं.' तो चिडून म्हणाला.

'किती मोठ्यानें बोलतां! आपण आतां दोघंच घरांत नाहींत इतकं मोठ्यानं बोलायला?' शरयू त्याच्या तोंडावर हात ठेवून म्हणाली. काशि-नाथनें रागानें तिचा हात झिडकारीत म्हटलें, 'तेंच मी विचारतों आहे! आपण या घरांत दोघंच कां नाहींत? इतर लोकांचा इथें संबंध काय?

माझ्या घरांत हे बाजारबुणगे कुणी आणून भरले? या [illegible] इथं यायला काय मी आमंत्रणं केलीं होतीं? काय शिंचा वनवास पहा! घर माझं अन् मला पाहुण्यासारखं वागवणं चाललं आहे. आतिथ्यालासुद्धां मर्यादा घालावींच लागते—'

शरयूनें ओळखलें कीं, यावेळीं त्याला बोलूं देणेंच फायद्याचें होतें. काशिनाथ तावातावानें आपलीं गाऱ्हाणीं तिच्यापुढें बोलून दाखवीत होता. पांच मिनिटांनीं गाऱ्हाणीं संपलीं तेव्हां तो विनवणीवर येऊन ठेपला—' पण शरयू, तुला हें कसं बरं वाटतं? तूं घरांतील मालकीण अन् तूं कांहींच कसं बोलत नाहींस? वास्तविक आज मी चिडलों ही चीड तुला यायला पाहिजे. शरयू, तूं उद्यां त्यांना जायला सांगनं—'

' पण असं पहा. चार दिवस पाहुणे म्हणून आलेल्या लोकांना एकदम तोडून टाकलं तर बरं दिसेल का?' शरयू म्हणाली.

काशिनाथ स्वतःशीच थोडा वेळ विचार करून म्हणाला, 'नाहीं. म्हणजे उद्यांच जा असं म्हणणं बरोबर नाहीं. पण हलके हलके त्यांना सुचवलें तर आपलं काम होईल. तुझीं माणसं आहेत तीं. तूंच त्यांना समजावून सांग. म्हणावं पुण्यांत लौकरच रेशनिंग सुरू होणार आहे. तेव्हां खायला मिळ-ण्याची पचाईत होईल. त्याच्या आंत ते गेले तर बरे.'

' ते नाहीं तरी एक पाऊस पडला म्हणजे हलणारच आहेत. पण मी म्हणतें, इतके दिवस आपण त्रास सहन केला तसं त्यांना गोडींत परत धाडतां आलं तर चांगलं नाहीं का? माझ्या आईवडिलांनाही किती धन्यता वाटेल. मी म्हणतें आपण आतां त्यांना थोडसं खुशींत ठेवावं—'

' म्हणजे? आजपर्यंत ते काय अरण्यांत पडले होते कीं काय? त्यांना गोडींत ठेवायचं म्हणजे त्यांना काय पंचपक्वानांच्या राशींत बुचकळून काढूं कीं काय?'

' थांबा. उगीच असं डोकं फिरल्यासारखं बोलूं नका. स्वतःच्या मना-शींच विचार करा. गेल्या दोन महिन्यांत माझ्या भावांशीं किंवा मामांशीं किंवा काकांशीं तुम्ही एक शब्द तरी कधीं गोडींत बोलला आहांत कां? सदान्‌कदा कपाळाला आंठ्या घालून त्यांच्याकडे पाह्यचं तुम्हाला शोभलं कां?'

काशिनाथ अंधारांत शरयूच्या तोंडाकडे डोळे फाडफाडून पाहू लागला! शरयूच कां ही? हीच कां हें सारें बोलते आहे?

'माझ्या भावांचा तुम्हाला कंटाळा, माझा मामा तुम्हाला नकोसा झाला आहे, माझ्या काकांना तुम्ही पाण्यांत पाहतां, आज माझीं माहेरचीं प्रेमाचीं माणसं तुम्हांला नको आहेत, उद्यां तुम्ही मलाही लाथ मारून घराबाहेर हाकलून द्याल?' शरयू संतापानें थरथरत म्हणाली.

'शरयू, तुला कुणींतरी माझ्या पश्चात् कांहीं तरी खोटंनाटं सांगितलं असलं पाहिजे. तुझ्या माणसांचा मला कंटाळा आला आहे असं मी कुणाजवळ तरी बोललों आहे का? अन् मला त्यांचा कंटाळा यायचं कारण तरी काय? आज आहेत उद्यां ते जातील—' काशिनाथ भाबडेपणानें म्हणाला.

'म्हणा! आणखी काय लागेल त्या शिव्या त्यांना मोजून द्या! आज त्यांना खोटें म्हणतां आहांत, उद्यां त्यांना आईबापावरनं शिव्यासुद्धां द्याल. त्यासुद्धां त्यांनीं मुकाट सहन करून घेतल्या पाहिजेत. कारण, मुलगी त्यांची आहेनं मी! या एका गुन्ह्याबद्दल त्यांना फांशी जायचीसुद्धां तयारी ठेवली पाहिजे—'

शरयू बोलतां बोलतां थांबली. आंतल्या बाजूनें सर्वांत ज्येष्ठ मेहुणे नुकतेच विडावगैरे खाऊन बाहेर पत्र्यावर हवा खायला आले होते.

'काय ताईसाहेब, येवढं जोरजोरांत काय चाललं होतं? भांडत तर नव्हतीस न काशिनाथपंतांशीं? हो! म्हटलं, पुण्याच्या लोकांचा हा गुण म्हटलं तुला एक वर्षांत कसा लागला? बाकी काशिनाथपंत, तुम्ही कांहींही म्हणा, तुमचं पुणं या भांडखोर लोकांनीं अगदीं नेस्तनाबूद केलं पहा. हे विद्वान लोक भांडल्याशिवाय एक दिवस सुना जाऊं देत नाहींत. हा म्हणे ह्या संघाचा अन् तो म्हणे कॉंग्रेस पार्टीचा. लागले भांडायला. मी म्हणतों अरे भांडतां काय असे?'

'नाहीं. तुमचा गैरसमज झाला आहे. आम्ही भांडत नव्हतों. सहज दोन महिन्यांनीं भेटलों तेव्हां सुखदुःखाच्या गोष्टी बोलत होतों.' काशिनाथ संथपणानें म्हणाला. मेहुण्यांनीं चमकून त्याच्या तोंडाकडे पाहिलें. परंतु अंधारांत त्याच्या मुद्रेवरचा खरा अर्थ स्पष्ट होणें शक्य नव्हतें. हसण्यावरी घालवीत मेहुणे पुढें म्हणाले—

'तुमच्या पुण्याला सिनेमाची एक मोठी सोय आहे बुवा ! कोपऱ्याला एक थेटर आहेच्च. रोज नवीन नवीन चित्रें दाखवताहेत लेकाचे ? आज मला वाटतं त्या मंडईतल्या थेटरांत 'पहिला पाळणा' कां कायससं आहे!'

'तेंच मी त्यांना म्हणत होतें. भाऊ, यांच्या दुकानला सुट्टी आहे. आपण सर्वांनीं मिळून तो सिनेमा पाह्यला जायचं मी त्यांना सांगत होतं.'

'अन् मग एवढं ओरडून कशाला बोलत होतीस ? बरं आहे जाऊं दे. आम्हाला हें तुमचं शिनेमाबिनेमा कत्राट तितकंस पसंत नाहीं. पण काशिनाथपंत, तुमचा शब्द मोडणं आम्हाला पसंत नाहीं. बाकी एक सल्ला देऊन ठेवतों, हें सिनेमाचं व्यसन चांगलं नाहीं बरं का—'

दुसऱ्या दिवशीं मर्जीविरुद्ध काशिनाथला नऊ आणे दराचीं सुमारें वीस तिकिटें खरीदावीं लागलीं. त्यांतल्यात्यांत पडद्यावर चित्रें पाहात असतां शरयू दोनअडीच तास जवळ बसलेली सांपडेल या भ्रामक विचारांत बिचारा जिवाची आटापीट करीत होता. शेवटीं आयत्या वेळीं त्याला ज्येष्ठ मेहुण्याची चर्पटपंजरी ऐकतच सिनेमा पाहावा लागला. मनांतून खूप जळफळत होता. पण बोलतो काय ?

होतां होतां एका महिन्यांत चारसहा सिनेमा झाले. दरखेपेला त्याला हें व्यसन बरं नव्हें हा जेष्ठ मेहुण्याचा उपदेश ऐकून घेत तिकिटें विकत घ्यावीं लागत आणि दरखेपेस त्याला पत्नीशिवाय इतर कोणातरी बहाद्-राच्या संगतींत दीडदोन तास काढावे लागत.

—मे महिना संपला. पहिला पाऊस आला. जून महिना ओलाचिंब स्थितींत पार पडला. जुलै उगवला तरी पाहुण्यांपैकीं एकालाही तळ हलवावेसें वाटण्याचें चिन्ह दिसेना. आज जातील उद्यां जातील म्हणून उराशीं आशा कवटाळून धरीत काशिनाथ एक एक दिवस मोजीत होता. परंतु एकानेंही जाण्याची वार्ता तोंडावाटे बाहेर काढली नाहीं. आणि शरयू तर आतां त्याची राहिलीच नव्हती !

मनुष्य आगतिक झाला म्हणून किती सहन करणार ? पत्नीवर तो आतां कमालीचा संतापला होता. परंतु नुसता संतापून करतो काय ? चार-चौघांत आपला संताप व्यक्त करण्याचें धाडस त्याच्या अंगांत मुळींच नव्हतें. खर्चा परी खर्च भरमसाट होत होते परंतु त्याला बोलतां येत

नव्हतें. त्याला कमालीचा मनस्ताप सहन करावा लागत होता. परंतु तो व्यक्त [illegible] एकही मायेची व्यक्ति त्याच्या आसपास नव्हती. आपल्याला ही सारी मंडळी बुडवायला आलीं आहेत हें त्याला स्पष्ट दिसत होतें परंतु हें बोलणार कुणाजवळ ? आणि बोलून उपयोग तरी काय ?

पावसाळा संपत आला. गौरी–गणपती उरकून गेले तरी घरांतील सैन्य अजून तळ देऊन राहिलेलें होतें. इतके दिवस त्याला घरांत काय त्रास होत असेल तेवढाच सहन करावा लागे, आतां तर त्याचे मेहुणे दुकानांत येऊन बसूं लागले. नुसते बसून राहिले नाहींत तर त्याच्या गिऱ्हाइकाशीं बातचीतही करूं लागले. काशिनाथचें गिऱ्हाईक डोळ्यांदेखत त्याच्या हातांतून निसटूं लागलें तेव्हां तो पुरता खवळला. आणि शरयूची चार दिवस गांठ घेण्याची कोशीष करून त्यानें पांचव्या दिवशीं तिला रोखठोक सवाल टाकला. माझ्या घरांतून हे लोक जाणार आहेत कां नाहीं हें मला समजलें पाहिजे.

शरयूनें त्याच्याकडे हंसून पाहिलें. एखाद्या हट्टी मुलाच्याकडे जसें पाहतों त्याप्रमाणें ती त्याच्याकडे पाहात म्हणाली, ‘म्हणजे तुम्हाला खरोखरीच माझ्या माणसांचा कंटाळा आलेला दिसतो आहे. मग कबूल करायला कां येवढे आढेवेढे घेतां ? ’

‘मी तुझ्याशीं लग्न लावलं आहे. तुझ्या माहेरच्या गोतवळ्याशीं नाहीं.’ काशिनाथ चिडून म्हणाला !

‘कोण म्हणतं आहे पण तसं ? त्यांच नशीब थोर म्हणून तुमच्या तडाक्यांतून ते सुटले. मी म्हणतें, माझं भोक्तृत्व म्हणून मी अडकलें.’

‘शरयू वाकडं बोलूं नकोस. पण मी तुला स्वच्छ सांगतों कीं, हें माझ्या घरांत चालायचं नाहीं. माझं घर म्हणजे वाटेल त्या चंगीभंगी माणसाला वाटेल तेव्हां पडशी टाकून उतरायला बांधलेली धर्मशाळा नाहीं.’ काशिनाथच्या कपाळावरच्या शिरा तट्ट फुगल्या होत्या !

‘तुमचं घर आहे ? अन् माझं नाहीं वाटतं ? तुम्हीच म्हणाला होतां आठवतं कां ? ‘ए वाऱ्या वाहूं नकोस.’ ‘ए घरधन्या, दुकानांत जाऊं नकोस !’ जी हुजूर, राणी सरकार !’ कां बोलत कां नाहीं ? मालकिणीची मोलकरीण झालें वाटलं दीड वर्षांतच ?’ शरयू कुत्सितपणें हंसून म्हणाली.

जखमेवर मीठ चोळल्यानें अशा वेदना होतात. काशिनाथनें प्रेमाच्या भरांत स्वतःला जोखून घेऊं दिलें होतें. आणि त्याचींच फळें तो भोगत होता. शरयूशीं आतां मात्र बोलण्याची सोय उरली नव्हती. तरी त्यानें जातां जातां दुकानांत लोक येतात म्हणून गुरकावण्यास सोडलें नाहींच.

'मग? आले म्हणून त्यांत तुमचं काय बिघडलं? माझ्या काकांच्या मामांचं मिरजेला वाण्याचं दुकान होतं. त्यांना धंद्यांतलीं सारीं यटकं पाठ आहेत. काका दुकानांत येऊन बसले तर तुमच्याच हजाराचे दोन हजार होतील. अन् मीच त्यांना सांगितलं होतं म्हणून ते दुकानांत येऊं लागले. नाहींतर त्यांचं काय अडलं होतं डाव्या पायाचं खेटर!' शरयू हलके हलके खुलासा करूं लागली.

'तूं त्यांना दुकानांत यायला सांगितलंस?' काशिनाथ स्वतःला विसरून मोठ्यानें ओरडला.

'हो–हो! मी त्यांना सांगितलं! अन् सांगून ठेवतें, कितीहि मोठ्यानें ओरडलांत म्हणून मी दबायची नाहीं. माझ्या घराचं हित मलाहि पाह्यलंच पाहिजे. तुम्हीं पुण्याचीं माणसं किती बिलंदर असतां तें मला कळून चुकलं आहे.' शरयू त्याच्या आवाजाच्या तोडीस तोड आवाज काढून उत्तरली.

काशिनाथनें कपाळाला हात लावला! आपल्या आयुष्यांत आपला सुखाचा वांटा फक्त एक वर्षाचाच होता हें त्याला पटलें. यापुढें स्वतःच्या घरांत व दुकानांत दोन्हीहि ठिकाणीं तो पहाऱ्यांत ठेवलेल्या कैद्यासारखा होता हें उघड होतें. शरयूला त्यानें हरप्रयत्नानें वस्तुस्थिति समजावून देण्याचा एकवार प्रयत्न केला परंतु शरयू त्याच्या प्रत्येक वाक्याचा विपरीत अर्थ घेऊनच बोलूं लागली. मार खाल्लेल्या कुत्र्याप्रमाणें अभिमानाची शेपटी खालीं करून तो दुकानांत गेला.

घराचे वासे फिरल्यावर माणूस काय करणार? दिवाळीचा सण आला आणि गेला. घर कायम होतें व घरांतील वस्तीही सुखरूप होती. उलट एका मेहुण्याची बायको बाळतपणासाठीं कोणत्या चांगल्या दवाखान्यांत पाठवावी याची चर्चा दररोज त्याच्या देखत होऊं लागली. अर्थात् त्याच्या मताची त्यांना कुणाला गरज भासणें शक्य नव्हतेंच. म्हणजे लौकरच त्याच्या या जगड्व्याळ कुटुंबांत आणखी एका जिवाची भर पडणार होती.

काशिनाथ कंटाळून गेला. शरयूला हें सर्व नीट समजावून द्यावें तरी कसें हेंच त्याला समजेना. माहेरच्या माणसांची ही घोरपड आपल्या दोघांच्या सुखाला कसा दांत लावीत होती हें तिला समजत नव्हतें. आणि हें समजावून देणें त्याला शक्य नव्हतें. शेवटीं एके दिवशीं तो इतका वैतागला कीं, दुकानांत आलेल्या काकांना व मामांना तो तोंडाला येईल तें टाकून बोलला. आणि इतकें झाल्यावर आतां घरीं धड जाण्याची सोय नाहीं हें पाहून दुकानच्या गल्ल्यांतील सगळी रक्कम व बँकेचें चेकबूक घेऊन परभारें तो स्टेशनवर गेला. होय ! काशिनाथ त्या दिवशीं घर सोडून पळून गेला.

काशिनाथचें पहिलें पत्र अलाहाबाद मुक्कामाहून सुमारें एक महिन्यानें आलें. मजकूर कांहीं विशेष स्वरुपाचा नव्हता. फक्त आपण घर सोडून कां पळालों याचें सविस्तर कारण त्यानें पत्नीस कळवलें होतें. आणि यापुढें जोंपर्यंत माहेरचीं माणसें घरांत आहेत तोंपर्यंत आपल्याला घरांत राहणें कसें अशक्य आहे याचेंही त्यानें सविस्तर विवेचन केलें होतें. शेवटीं त्यानें म्हटलें होतें—

'माझ्या स्वतःच्या घरांत मी चोरासारखा वागूं लागलों. प्रत्येकाला भावना म्हणून कांहींतरी असतातच. तुझ्या माहेरच्या माणसांना माझ्या कपाळावरील आठ्या पाहून जर अपमान झाल्याचें स्वप्न पडूं लागलें, तर माझी काय अवस्था झाली असेल याची कल्पनासुद्धां करणें अशक्य आहे. असो. एका वाफ्यांत दोन मोठाले वृक्ष वाढणें शक्य नाहीं. तूं माहेर आणि सासर या दोन्ही वृक्षांना एकाच वाफ्यांत वाढवूं पाहात होतीस. पण तें अशक्य आहे. तुला माहेरची गोडी वाटत आहे. ठीक आहे. मी दूर होतों. कांहीं दिवसांनीं माझी खात्री आहे देव तुला सद्बुद्धि देईल–'

शरयू एक अक्षर बोलली नाहीं. तिन्हीही मेहुण्यांनीं, काकांनीं व मामांनीं आळीपाळीनें तें पत्र वाचून पाहिलें.

'हं ! तरी मी म्हणत होतों आमच्या वडिलांना कीं या माथेफिरूच्या गदरांत आपल्या शरयूला बांधून तिच्या जन्माचं वाटोळं करूं नका—' पहिले मेहुणे म्हणाले.

'अण्णाराव, हा नुसताच माथेफिरू नाहीं बरं का. हा शुद्ध पागल

दिसतो आहे. आणि या वेड्याच्या पायीं आमच्या ताईचं आम्ही नुकसान केलं' दुसरे कपाळाला हात लावून म्हणाले.

'भाऊराव, हा यापूर्वी कधीं ठाण्याला किंवा येरवड्याला जाऊन आला होता कां याचा तपास आपण काढला असता तर ही वेळ कशाला आली असती? आतां आपल्या ताईवर कोसळलेल्या आपत्तींत तिला धीर तरी कुणी द्यायचा?' तिसरे तात्याराव संभावित मुद्रेनें शरयूकडे पहात म्हणाले.

काकारावांनीं मामारावांकडे पाहिलें आणि मामारावांनीं उलट काकारावांकडे पाहिलें. शरयू कांहींच बोलली नाहीं.

दुसरें पत्र आणखी एक महिन्यानें लाहोरहून आलें. त्यांत मजकूर जवळ जवळ पूर्वीचाच होता, फक्त तात्या, भाऊ आणि अण्णा या तिघा रावांच्या प्रकृतीची खुशाली कळवण्याबद्दल मोठ्या कळवळ्यानें काशिनाथानें तिला विनंती केली होती. आणि स्वतःचा पत्ता मात्र दिला नव्हता. त्याच्या लेखणींतला मागच्या वेळेचा स्पष्टवक्तेपणा जाऊन यावेळीं उपरोधिकपणा थोडासा बोंचण्यासारखा होता. परंतु तिघाही रावांनीं तें मनावर न घेण्याचें उदारपणें शरयूला बोलून दाखवलें. काकाराव आणि मामाराव यांनीं धूर्तपणानें आपले डेरे आठ दिवसापूर्वींच हलवले होते. शरयूनें बंधूराजांच्या भाषणाकडे संपूर्ण दुर्लक्ष केलें. ती आता स्वतःशींच विचार करूं लागली.

तिला काशिनाथचा प्रथम राग आला होता. भरल्या घरांतून एकदम न सांगतांसवरतां निघून जायचें तिला मुळींच आवडलें नव्हतें. परंतु रागाबरोबरच तिला त्याची थोडीशी दयाहि पण वाटूं लागली होती. काशिनाथसारखा कर्ता पुरुष घरांतून निघून जातो म्हणजे सामान्य गोष्ट नव्हती. कोणताहि पुरुष इतक्या आततायीपणानें उगाच वागणें शक्य नाहीं. आणि त्यांत तिच्या वडिलांचें सांगलीहून आलेलें पत्र वाचून तर ती जास्तच बिथरल्यासारखी झाली होती. वडिलांच्या कानांवर जें काय गेल्या सातआठ महिन्यांत घडलें त्याची उडत उडत हकीगत गेली असावी. त्यांनीं तिला आपल्या उनाडटप्पू बंधूराजांना, ऐतखाऊ काकाला आणि चंगीभंगी मामाला ताबडतोब घरांतून हाकलून देण्यासंबंधीं आर्जवून लिहिलें होतें. आणि तेंच वाक्य तिच्या मनांत घर करून राहिलें होतें. 'पति

जोंपर्यंत पाठीशीं उभा आहे तोंपर्यंत पत्नीच्या कोणत्याहि शब्दाला मान असतो. तो कांहीं कारणानें दूर झाला कीं, ती मातीमोल ठरते.' हें वाक्य ती स्वतःच्या ताज्या अनुभवाशीं ताडून पहात होती. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, वडिलाच्या शब्दांतील खरेपणा तिला हळुहळू जाणवूं लागला होता.

काकाराव पत्नी–मुलांसह निघून गेले. परंतु जातांना ते तिच्याशीं धडपणें बोललेसुद्धां नाहींत. मामारावांनीं तर तिला 'आतां दुकान फुंकून टाकून सांगलीला बंधूंच्या घरांत तुकडे मोडीत बसा' असा कुत्सित आशीर्वाद द्यायलाही कमी केलें नाहीं. लहानगीं मुलें, त्यांना काय कळणार? पण तींही पढवल्याप्रमाणें तिला वेळींअवेळीं खिजवूं लागलीं. 'पळपुट्या नवऱ्याची फडतूस बायको' म्हणून मुलांनीं आपापसांत उच्चारलेले शब्द तिला सहन करून घेणें फार जड गेलें.

परंतु अजून बंधूराजांनीं व त्यांच्या लवाजम्यानें तिला सोडलें नव्हतें. मात्र घरांत आतां तिच्या शब्दाला बेताचीच किंमत होती. सारा प्रपंच ज्येष्ठ अण्णाराव आणि त्यांच्या पत्नी यांच्यामार्फत चालवला जात होता. शरयूजवळचे पैसे जसजसे संपूं लागले तसतशी ती ओढून धरूं लागली आणि याच ठिकाणीं त्यांच्यांत कलहाच्या ठिणग्या पडूं लागल्या. शरयू काशिनाथला परत बोलवायला आतां उत्सुक होती पण त्याला पत्र तरी कोणत्या पत्त्यावर धाडावयाचें हा प्रश्न होता.

पुढें सहा महिने पत्रच आलें नाहीं. शहरवस्तीला खर्च फार होतो या सबबीवर बंधूराजांनीं आपापले कबिले परत सांगलीस धाडून दिले होते. स्वतां शरयूला धीर देण्यासाठीं मागें राहिले होते. शरयू त्यांच्याशीं फार करून बोलण्याचें टाळीत असे. तिनें त्यांचा मगदूर केव्हांच ताडला होता.

आणि एके दिवशीं काशिनाथचें बडोद्याहून पत्र आलें. पाकिटावरचें हस्ताक्षर ओळखून तिनें घाईघाईनें पत्र उघडलें. पत्र वाचून ती आनंदानें बेहोष होऊन गेली. पत्रांत पुढीलप्रमाणें मजकूर होता.

'गेले सहामहिने मी बडोद्यासच आहें. येथील व्यायामशाळेंत मी पहिल्या दिवसापासून अत्यंत नियमानें जात असतों. माणसानें मृदु असावें. परंतु शरीरानें कणखर असावें हें तत्त्व मला अनुभवानें

पटलें आहे. माझी बरीच प्रगति झाली आहे. लाहोर मुक्कामीं एका मुलतानी स्त्रीची व माझी थोडीफार ओळख झाली होती, तिनें मला मोठ्या आग्रहानें बडोद्याला आणलें व माझी तनूदुरुस्ती करण्याची ती खटपट करूं लागली. ती स्वतः चांगलीच दणकट आहे. वेळ पडली तर कोपरानें दगड फोडण्याची तिची तयारी आहे. तिच्या सतत उत्साहानें व पूर्वीच्या कटु अनुभवानें मीही मनावर घेतलें. आतां मी चांगला तगडा जवान बनलों आहे. ती मुलतानी स्त्री मोठी हुशार आहे. तिच्याच सल्ल्यावरून मी पुढच्या आठवड्यांत पुण्यास येणार आहें. कदाचित तिलाही बरोबर आणीन. दुकान आणि घर फुंकून टाकावें व कायम वस्तीला लाहोर लखनौकडेच जावें हा माझा तिकडे येण्याचा हेतु आहे.'

ही मुलतानी बया कोण ? आणि तिचा व काशिनाथचा संबंध काय ? ह्या विचारानें तिचें मन बरेचसें हेलकावे खाऊं लागलें परंतु तो परत येणार आहे या कल्पनेनें ती एकदम आनंदित झाली. ह्या खेपेचें पत्र मात्र तिनें बंधूराजापासून दडवून ठेवलें.

चवथ्या दिवशीं खरोखरच काशिनाथ परत आला. परंतु ती मुलतानी कां सुलतानी बया त्याच्याबरोबर दिसत नव्हती. शरयूला हें सुचिन्ह वाटलें. काशिनाथला आतां काय वाटेल तें झालें तरी पुन्हा जाऊं द्यायचें नाहीं हा विचार तिनें कायम करून टाकला होता. बरोबर ती बया नव्हती हें एकप्रकारें चांगलेंच होतें. परंतु आतां ती घाई करणार नव्हती. काशिनाथला पुन्हा भडकूं देतां कामा नये. युक्तियुक्तीनें, गोडीगुलाबीनें त्याला आतां आपल्याकडे ओढून घेतला पाहिजे. आणि खरोखरच तालमीनें त्याचे दंडही पण कसे पिळदार दिसत होते !

काशिनाथ कोणाशींच एक अक्षर सुद्धां बोलला नाहीं. सर्वांचें जेवण झाल्यावर तो तडक माडीवर जाऊन कॉटवर पडला. थोड्या वेळानें तिघेही मेहुणे त्याच्या भोंवतीं जमा झाले. शरयू कसेबसे दोन घांस गिळून तात्रडतोब त्यांच्या मागोमाग वर धांवत गेली.

'आम्ही म्हटलं होतं तसंच झालं. अहो, बायकोशिवाय तरुण गड्याला किती दिवस करमणार ?' तात्याराव डोळे मिचकावून म्हणाले.

'त्यांतून सच्छील माणसाला घरच्या सत्तेच्या बायकोशिवाय जवळ उभं

राहूं देतोच कोण! अग अग म्हशी अन् मला कां ग नेशी त्यांतला प्रकार' अण्णाराव हळूंच म्हणाले.

'आतां आपणही आपलीं माणसं बोलावून घ्यावींत हें बरं—' भाऊराव काशिनाथच्या तोंडाकडे पाहात उद्गारले. काशिनाथ ताठ उठून बसला! गोगलगाय आतां उलटली होती.

'अहो भाऊसाहेब, अण्णासाहेब अन् तात्यासाहेब, तुम्ही आज रात्रींच्या गाडीनं सांगलीला परत जातां कीं नाहीं?' तो शांतपणें म्हणाला.

'माझं नांव भाऊसाहेब नाहीं. मला सर्वजण भाऊराव म्हणतात—' छाती फुगवून सदर नांवाचे धनी आढ्यतेनें म्हणाले.

'अन् मला अण्णाराव ही संज्ञा आहे.'

'अन् मला तात्याराव म्हटलत म्हणून जीभ कांहीं झडणार नाहीं. भाषा शुद्ध ठेवाल कीं नाहीं?' तिसरे म्हणाले.

काशिनाथनें तिघांच्याकडे आपादमस्तक न्याहाळून पाहात म्हटलें, 'तुम्ही राव असा नाहीं तर साहेब असा. मला दोन्हीही सारखंच आहे. तुम्ही सर्वजण आज गेलांत तर बरं आहे नाहीं तर याद राखा बच्चंमजी—'

'काय हो, इतका वेळ तुमची मग्रुरी सहन केली. नाहीं गेलों तर काय करणार आहांत?' जागचे उठण्याचा प्रयत्न करीत अण्णाराव अवसानानें म्हणाले. परन्तु उत्तराऐवजीं काशिनाथनें त्यांना जागच्या जागींच डाव्या हातानें दाबून टाकलें. त्याचा हा आवेश पाहून बाकीचे दोघे राव थक्कच झाले.

—रात्रीं ते तिघेही राव सांगलीस परत गेले. शरयू आणि काशिनाथ आतां पुन्हां जवळ जवळ दोन वर्षांनीं त्या घरांत एकटेच होते.

जेवणें उरकल्यावर शरयू पाण्याचा तांब्या घेऊन वर आली. प्रथम तिनें दिवा बंद केला व नंतर काशिनाथच्या कुशींत तिनें आपलें मस्तक खुपसलें. काशिनाथ उठून तडक दिव्याजवळ गेला. दिवा लावून तो तिच्यासमोर खुरमांड्या घालून बसला. तिच्याशीं अजूनपर्यंत एक शब्दही तो बोलला नव्हता. शरयूनें त्यांच्याकडे पाणावलेल्या डोळ्यांनीं पाहिलें व ओठांचा चंबू करून आपलें तोंड पुढें केलें. काशिनाथ एक क्षणभर निश्चल स्थितींत तिच्याकडे पाहात होता. नंतर तो पटकन् हंसला व पुढें

वांकला ?–शरयूनें त्याच्या अंगावर आपल्या जवळची उशी लाडिकपणानें फेकली.

'ती मुलतानी कां सुलतानी बया मला पाह्यची आहे. मेलीच्या झिंज्याच उपटीन मी. दुसऱ्यांचीं माणसं अशीं पळवायचीं म्हणजे काय ?' ती लटक्या रागानें म्हणाली. काशिनाथनें हंसून तिच्याकडे पाहिलें. 'तुला ती मुलतानी बया पाह्यची आहे ? खरंच ? तूं तिच्या झिंज्या उपटणार आहेस ? चल तुला दाखवतों–' म्हणून म्हणत काशिनाथनें तिला समोरच्या मोठ्या आरशासमोर नेऊन उभे केलें.

'ही बघ माझी मुलतानी बया ! उपट तिच्या झिंज्या' काशिनाथ हंसून म्हणाला !

जवळजवळ दोन वर्षांनंतर ते प्रथमच एकमेकांजवळ आले होते !

---

## हरबाचा बदफैलीपणा ! : : ५

मावळतीचा सूर्य बुडण्याच्या बेतांत आला होता. सारजा त्याच्याकडे किती-तरी वेळ टक लावून पहात होती. साडेतीन पायाच्या आधारावर आज पांच पन्नास पावसाळ्याला न जुमानणारें एक बाकडें तिच्यासमोर होतें आणि त्या बाकड्यावर शेवभजी खात बसलेल्या गिऱ्हाइकानें आत्तांपर्यंत तीनचार वेळां तिच्या कानावर आपली तक्रार घालण्याचा निष्फळ प्रयत्न केला होता. तिन्हीही वेळां तिचें लक्ष त्याच्याकडे गेलें नाहीं. यापुढें तक्रार करण्याच्या रिकाम्या फंदांत न पडतां एक एक भजें अंतर्बाह्य पारखून खाणेंच हितावह आहे असें त्या गिऱ्हाइकाच्या मनांत आलें असावें. सारजेचें त्याच्याकडे लक्ष नव्हतें हें खरें आहे. दिवसभर ती हॉटेलाचें काम लक्ष लावून करी परंतु संध्याकाळ झाली कीं पुण्याच्या शेवटच्या मोटारीकडे तिचें लक्ष खिळून राही. मारुती डरावरनें पुण्याहून शेवटची गाडी सास-वडच्या स्टँडवर आणून सोडली कीं तिच्या जितेंवाची कोण धांदल उडे. आज हरबा गेल्यापासून सुमारें सहा महिने तिचा हा रोजचा कार्यक्रम होऊन बसला होता.

नवऱ्यानें घातलेल्या ‘ बलभीम ’ हॉटेलांत दिवसभर थोरल्या बहिणीच्या साहाय्यानें गिऱ्हाइकाची ये जा सांभाळायची, कमी पडत चाललेला माल मागच्या बाजूस तीन दगडांवर कढईत पुन्हां तयार करावयाचा, जुन्या

ताटांतला केरकचरा गिऱ्हाइकाच्या समजुतीखातर झाडल्यासारखा करून पुन्हां त्यावरच नवीन बनवलेला माल शीगेला लावायचा, कपबशा द्यायला ठेवलेल्या पोरावर अधून मधून खेकसल्याप्रमाणें करावयाचें, एकाद्या फाजील चिकित्सेखोर गिऱ्हाइकाला कुर्यानें ' ममईचं हाटेल या परीस काय उजवं येनार हाय ? ' म्हणून चढेलपणानें उत्तर देऊन गप्प करावयाचें, हा सारा दिवसाचा खेळ होता. संध्याकाळ झाली कीं सारजाला हरबाची याद येई !

मारुती ' डरावर ' दिवे लागणीला शेवटची मोटर पुण्याहून घेऊन येई. त्याच्या येण्याकडे तिचें सारें लक्ष लागलेलें असें. हरबा नागपूर मेलच्या अपघातांत सांपडून गारद झाला. त्याच्या अंगावरच्या कपड्यांत चार दोन पत्रं सांपडलीं म्हणून तरी त्याच्या मृत्यूची बातमी त्यांना सासवडास कळली. हरबा तिला पुन्हां जिवंत दिसला नाहीं. नागपुरच्या अलीकडे एकदोन स्टेशनावर उतरून त्याला आपल्या बहिणीला तिच्या नवऱ्याच्या घरीं नांदणुकीला पोहोचते करायचें होतें. त्याप्रमाणें तो सहा महिन्यापूर्वी एके दिवशीं सकाळीं मारुतीच्या पहिल्या मोटारनें पुण्याकडे निघून गेला—आणि आठ दिवसांनीं तिला कळलें कीं हरबा परत येत असतां गाडी पडली आणि हरबाचं हाडसुद्धां सांपडलं नाहीं. जास्त चौकशी करण्याला इतक्या लांब जाणार तरी कोण ? दैवाला दोष देऊन बिचारी सारजा मुकाट्यानें अश्रु ढाळूं लागली. आणखी आठ दिवसांनीं हरबाच्या खिशांतले कागदपत्र तिच्या नांवावर कोणीतरी पोष्टामार्फत पाठवून दिलेले तिनें डोळ्यानें पाहिलें तेव्हां तर तिची पक्कीच खात्री झाली. हरबा तिला आतां पुन्हां दिसणें शक्य नव्हतें हेंच खरें.

तरीपण आशा वेडी असते. मेलेला माणूस परत येणें शक्य नाहीं हें जरी खरें असलें तरीं सारजेला, राहून राहून वाटे कीं हरबा जिवंत असावा. काल परवां आपल्या गालावर हात फिरवून गेलेला हरबा पुन्हां परत येणार नाहीं हें कशावरून ? आणि याच वेड्या आशेवर ती जगत होती. नवऱ्याच्या पश्चात् तिनें सासवडहून दोन तीन मैल दूर असलेल्या कोंडित गावीं आपली नवरा गेलेली थोरली बहीण भागाबाई होती तिला बोलवून घेतलें व दोघीजणींनीं मिळून हरबानें संस्थापन केलेलें हॉटेल आजतागायत

चालवलें होतें. भागाबाई तिच्या या वेड्या आशेला मोडून काढण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असे. कागदपत्रांचा पुरावा तर होताच. त्यापेक्षां जास्त महत्त्वाचा पुरावा तिनें सारजेला दाखवला होता. पुलाच्या पल्याड एक भूत भविष्य जाणणारा 'बाबा' होता. त्याच्याकडे तिनें सारजेला दोनदां नेलें होतें. त्या बाबानें नक्षत्रांना विचारून आपलें नक्की मत दिलें होतें कीं 'हरबा पुन्हां दिसला तर धंदा सोडून देईन.' बिचारी सारजा जास्तच कष्टी झाली. परंतु अजून तिनें हरबाचा नाद सोडला नव्हता. रोज संध्याकाळीं हॉटेलच्या पुढच्या सारवलेल्या ओट्यावर उभी राहून मारुतीच्या शेवटच्या गाडीची ती वाट पाही. त्याचें कारण उघड होतें. हरबा कधीं तरी शेवटच्या गाडीनें आल्याशिवाय राह्यचा नाहीं ही तिची ठाम समजूत होती.

आजही ती नित्याप्रमाणें ओट्यावर उभी होती. गिऱ्हाइकाची भजीं आटोपलीं होतीं. बहुतेक बरींचशीं भजीं त्यानें शेजारींच आशाळभूत मुद्रेनें जीभ बाहेर काढून वखवखणाऱ्या कुत्र्याला खायला घातलीं होतीं. आतां त्याला एक शिंगल पाहिजे होता. मालकीणबाईचें लक्ष वेधण्याकरतां त्यानें आतांपर्यंत एक-दोन वेळां हलकेच हाका मारून पाहिल्या होत्या. शेवटीं नाइलाज होऊन तो ओरडला–

'अहो बाई'—सारजानें त्याच्याकडे पाहिलें व कपाळाला आठ्या चढवून म्हटलें, 'आतां जा कीं गुमान.'

'अहो पण मला शिंगल च्या हवा आहे'—

'च्या ? तुझ्या यानं ठेवला हाय ! च्या मागतुया ! आर लढाईमुळं सरकारला च्या प्यायला येळ तरी मिळतो हाय कां ?'

'पण येळ नसायला मी काय लढाई करणारं सरकार हाय व्हय ? चला मला बोलायला वेळ नाहीं. अंधार पडायच्या आंत मला पुलापल्याड गेलं पाहिजे. एक फर्मास च्या आणा. दूध जास्ती अन् पानी कमती—' गिऱ्हाईक कुत्र्याच्या अंगावर शेवटचें भजें भिरकावून देत म्हणालें.

'आतां तुम्हास्नी काय सांगूं ? अव, दुकानांत साखरेचा दाना बी न्हाय म्हून माझी भन माणकू शेटाकडं साखर आनाया कवाधरन गेलीया. तुम्ही आतां मुकाट बाट धरा, जा.' सारजा एवढें बोलून गिऱ्हाइकाशीं

जास्त हुज्जत न घालतां दूरवरून येणाऱ्या मारत्याच्या मोटरीकडे आधाशी-पणाणें न्याहाळून पाहूं लागली. गिऱ्हाइक चरफडत निघून गेलें परंतु तिला त्याची पर्वा करण्याचें काय कारण होतें?

मारत्याची मोटर तिच्या हॉटेलसमोरच्या पत्र्याच्या [illegible] येऊन थांबली. 'हो हो, येऊं द्या मागं' इत्यादि चिरपरिचित आवाज ऐकूं येऊं लागले. मोटर थांबल्यावर सात आठ आसामी खालीं उतरले. आजही हरबा त्या गाडींत आला नव्हता. सारजा खिन्न मुद्रेनें ओट्यावरून खालीं उतरली. मारत्या आपली मळकी टोपी, जास्तच मळलेल्या तेलकट विजारीला झाडून साफ करण्याचा प्रयत्न करीत तिच्या दुकानांत शिरला. एका गिलासांत त्यानें अर्धवट पाणी भरून घेतलें व दोन चार चुळा भरून तो त्या बाकावर आरामांत बसला.

'आजही धनी गवसले न्हायती व्हय, मारुतराव!' सारजेनें त्याला अधीऱ्या आवाजांत प्रश्न केला! मारुती जांभईचा आ मिटून हंसत म्हणाला—

'सारजाबाई! काय येड हाय तुमचं! नदीवर भसम झालेलीं माणसं कंदी जिंदी होऊन परत येऱ्यात व्हय! सहा महिनं झालं पर तुमचं येड काय हटत नाय! भागाबाई कुठं गेल्याती? आज च्या द्यायचा नाय व्हय अमास्नी?'

'च्या? गुळाचा खडाबी डबक्यांत नाय आन् भागाबाई साखऱ्या आणाया माणकू शेटाकडे गेली ती दोन घंटं झालं तकडंच गेलीया. काय वाइच् सोडा, लिंबू पायजे असंल तर देतें गलास धुवून—' सारजा तत्परतेनें ग्लास धुवायला गेली. मारत्यानें विचार केला. फुकटांत चहा नाहीं तर फुकटात सोडा काय वाईट?

मारत्या निघून गेल्यावर सारजेनें इतका वेळ विसळायच्या कपबशा तशाच पडलेल्या होत्या त्या गोळा केल्या आणि बादलींत नेऊन बुचकळल्या. सहा महिन्यांत हॉटेलला किती वाईट कळा आली होती. फुटक्या कानाचे गिऱ्हाइकाला देणें हरबाला कमीपणाचें वाटत असे! त्यांच्या लग्नाला चार कप वर्षें झालीं होतीं तेव्हांपासून ती हॉटेलमध्यें हरबाला गिऱ्हाइकांपुढें वाकतांना रोज पहात असे. हरबा जिभेचा मोठा गोड होता! मोटार स्टँडच्या परिसरांत त्याच्या दुकानासारखीं आणखी तीनचार हॉटेलें होतीं. परंतु हरबाचें

म्हणणें असें कीं पुण्यामुंबईचें गिऱ्हाईक आपल्याकडेच येणार! पुण्याच्या माणसांना फुटके कप अन् तडा गेलेल्या बशा कधीही खपायच्या नाहींत. आणि हें मोठें गिऱ्हाईक आपलें व्हावें आणि टिकून राहावें येवढ्यासाठीं हरबा काय काय नव्या युक्त्या शोधून काढी. एकदां तर तो पुण्याला गेला आणि येतांना एक मोठें गाण्याचें खोकें अन् कसल्याशा काळ्या बांगड्या घेऊन आला. त्यादिवशीं ग्रामोफोन लावतांक्षणींच सारजेला हरबाचा कोण अभिमान वाटला! क्षणभरच तिच्या मनांत विचार चमकून गेला कीं सासवडसारख्या भिकार गावीं राहवं लागत होतं म्हणून नाहींतर पुण्याला जर आपण असतों तर हरबानं आख्या पुण्याला वेड लावलें असतें. हरबावर ती नितांत खूष असे. आणि तिचा हरबा तिला सोडून गेला होता!—खरंच कां तो? —

—आणि चमकून तिनें मागें वळून पाहिलें. तिच्या खांद्यावर कुणीतरी हात ठेवल्याचा तिला भास झाला! मागें वळून पाहतांक्षणींच ती देहभान विसरली. हातांतला कानतुटका कप तसाच जमीनीवर टाकून ती चटकन् उभी राहिली. घाईघाईनें तिनें खांद्यावर घसरलेला पदर डोक्यावर ओढून घेतला. आनंदातिरेकानें ती वेड्यासारखी त्या व्यक्तीकडे पाहूं लागली. घरधनी? हरबा? खरंच, धनी परत आले होते? कां हेंबी पुन्हां सपन? तिनें घाईघाईनें स्वतःच्या दंडाला चिमटा घेऊन पाहिलें. डोळे मिटून घेतले, पुन्हां उघडले. पुन्हा मिटले पुन्हां उघडले. छे! स्वप्न नव्हतें तें. हरबाच तिच्यासमोर उभा होता! आणि तो कांहींतरी तिच्याशीं बोलत होता.

'कां लई येडी झालीस व्हय मला पाहून? अग असं त्वांड वासून काय माज्याकडं पघतीस? मी खराच जिंदा आहे. तुला कुनीतरी काय तरी मनचं सांगून दिलं. अग मी मरंन कसा? चांगला जिंदा आहे. संशाव असंल तर माझ्या पाठाडावर धपका घालून पहा—' हरबा म्हणाला.

सारजेनें खरोखरीच संशयनिवृत्ति करून घेण्यासाठीं हरबाच्या पाठींत एक नाजूकसा प्रहार करून पाहिलें. आतां मात्र तिची खात्री झाली. तिच्या समजुतीप्रमाणें ती हरबा जिंदा असावा असें समजत होती त्याप्रमाणें खरोखरीच हरबा आज जिंदा तिच्यापुढें उभा होता! तिनें चटकन् हरबाच्या खांद्यावर आपली मान टाकली व ओक्साबोक्शी रडण्यास प्रारंभ केला.

हरबानें तिच्या पाठीवरून हलकेच हात फिरवला. तिची परोपरीनें समजूत घालण्याचा तो प्रयत्न करूं लागला. जों जों हरबा तिला मायेनें कुरवाळी तों तों तिला जास्त जास्त रडें फुटूं लागलें. इतके दिवस वाट पाहिल्याचें आज सार्थक झालें होतें. तिचा हरबा तिला परत जिवंत मिळाला होता. आणि साऱ्या सासवड गांवच्या मंडळींनीं तिला वेडी ठरवलें होतें. प्रत्येकजण तिच्या आशेकडे पाहून मनांत तिला वेडी समजत होता. पण आज तीच शहाणी ठरली होती. थोड्या वेळानें जेव्हां तिला आपल्या या सुखाचा आवेग आवरून धरतां येऊं लागला तेव्हां तिनें हरबाचे दंड चांचपून पाहिले. त्याच्या तोंडावरून हात फिरवून तिनें आपल्या हाताचीं बोटें स्वतःच्या कानशिलावर टेकून उलटीं मोडलीं. धांवत जाऊन तिनें हरबावरून एक भाकरीचा तुकडा व तपेलीभर पाणी ओवाळून टाकलें. हरबा तिच्या या कृतीकडे कौतुकानें पाहात होता.

'व्हय! माज्या सारजा, अग किती मला आतां तूं जपनूक करशील? अग मी तुझाच हाय! असा गाडीखालीं गवसाया अन् मराया मी काय पुन्या–मुंबईच्या कालिजांत शिकलेला हरबा काडीपैलवान हाय व्हय!' हरबा हंसत म्हणाला.

'पर धनी, इतके दीस व्हता तरी कुटं! आज घरची याद आली व्हय? नागपुरासनं कव्हां माघारी आलेत? आन् सहा महिनं व्हता तरी कुठं? मला समदं समदं ऐकाया व्होवं. इकडं माजा जीव टांगणीला लागला व्हता तवां तुम्ही कुटं व्हता? आन् आतां मारत्याच्या मोटारींतनं मला कसं गवसला न्हायती?'

'म्हंजी मी मारत्याच्या मोटारींतन येनार हें तुला कुनी सांगितलं? मी त्या शिदबाच्या गाडीतनं आतांच आलों नव्ह कां? शिदबाची गाडी पुण्याहून दिवसाची निघाली पर घाटामंदी पंगचर झालं म्हून बसावं लागलं. तिकल्यात् मारत्याची गाडी पास झाली.' हरबा म्हणाला. इतके दिवस कुठें गुंगला होता हा प्रश्न विचारण्याकरितां सारजा पुन्हां तोंड उघडणार तोंच भागाबाई हातांत साखऱ्याची पिशवी घेऊन आंत आली. हरबाला पाहतांक्षणीच तिचीही सारजेप्रमाणें आश्चर्यानें त्रेधातिरपीट उडाली. थोड्याच वेळानें तिचीही खात्री झाली कीं हरबा जिवंत परत आला आहे.

'पर इतके दिस तुमी मंग होता तरी कुठं ?' तिनें थोड्याशा रुष्ट स्वरांत हरबाला प्रश्न केला.

'संमदं सांगतों—पर आधीं भाकरतुकडा नरड्याखालीं गेल्या बिगार एक सबुद बाहीर निघायचा न्हाय—' हरबा सारजेकडे पाहून म्हणाला.

'व्हय गं व्हय ! धनी, बराबर आहे तुमचं म्हननं. भाकर टुकडा खा. पानी प्या आन् मंग संमद सांगा—' सारजा घाईघाईनें म्हणाली. आणि तिनें कधीं नव्हत आणि तें सुद्धां महाग मिळणाऱ्या राकेलनें भपकन् चूल पेटवली. लाकडी थाळ्यांत वीतभर पिठाचा ढीग करून ती पीठ मळायला बसली. उजव्या हातांतल्या चांदीच्या पाटल्या डाव्या हाताच्या करांगुलीनें मागें सारल्यासारख्या करून तिनें भाकरी थापायला सुरुवात केली. आज तिला अगदीं नव्या नवरीसारखें झालें होतें. भाकरी थापून तयार झाली पण तव्याचा पत्ताच लागेना. तवा सांपडला पण तो तापल्याशिवाय भाकरी त्यावर टाकणार तरी कशी ? आणि एकेक पळ म्हणजे तिला युगासारखा वाटत होता ! हरबाला भूक लागली होतीनं तिच्या ? जणुं काय सहा महिने तो उपाशीच होता !

भागाबाई मात्र एकदम तोंडाला कुलूप बसल्याप्रमाणें चूपचाप होती. सहा महिन्यांनंतर हरबा परत आला होता. हरबा गेला, मेला, तो कायमचा परत येणार नाहीं हें धरूनच तिनें सारा बेत आंखला होता. बहिणीच्या दुःखाला विसर पडावा म्हणून ती कोडितहून सासवडास प्रथम आली होती. परंतु पुढें बहिणीच्याच घरीं कायमची रहाण्यास ती तयार झाली होती. सासवड गांव खेड्यांतच जमा करावें लागेल तरी पण कोडीतच्या मानानें तें शहरच ठरेल. ह्या शहरची हवा आणि तेथील लोक भागाबाईला मानवले होते. ज्या ज्या वेळीं बहिणीचें हरबाविषयींचें वेड थराला जाई तेव्हां तेव्हां तिनें सारजेला निष्ठूरपणें मोडून काढलें होतें. सारजा एकटी असणेंच भागाबाईच्या दृष्टीनें फायद्याचें होतें. परंतु आतां हरबा परत आला होता तेव्हां तिला परत गांवीं जाणें प्राप्त होतें. कपाळाला आठ्या चढवून भागाबाई विचार करूं लागली कीं सहा सहा महिने लोक आपल्या बायकांना सोडून मेल्याच्या सबबीवर दूर राहूं लागले आणि शेवटीं परत आले तर सरकारचा एकादा कायदा नाहीं का त्यांच्याकरतां ?

कायद्यानें या लोकांना पुन्हां घरांतून हाकून लावतां येणार नाहीं कां ? आणि विचारासरशीं भागाबाईचे दातवणानें काळे झालेले दात राकेलच्या पत्र्याच्या दिव्याच्या प्रकाशांत एकदम चमकूं लागले.

भाकर खाऊन झाल्यावर भागाबाईनें आपण होऊन प्रथम प्रश्न केला, ‘ आन् इतके दिवस होतां तरी कुठं ! ’

हरबानें सुपारीचें खांड दाढेंत ढकललें आणि खुलासा करण्यास घसा साफ केला,—

‘ म्हंजी तुम्ही समजत होतां मी म्येलों म्हून ! पर मी म्येलोंच नाहीं. ’

‘ त्ये तर आतां चिमनीच्या उजेडावानी लख दिसतयां,पर मग ग्येलतां कुठं ? ’ भागाबाईनें गंभीर मुद्रा करून प्रश्न केला.

‘ गंगूताईला तिच्या घरीं गुदरून मी परतीला निघालों.रातकिडे सारखे ‘ टिर टिर टिर ’ करीत व्हते, गाडी अक्शी जोसांत पळत होती. पुन्याचा माझ्या वळखीचा एक वकिलाचा कारकून माझ्या संगट येत व्हता. गाडींत माणसाची गर्दी म्हंजी ही थाप लागलेली. माणसाला विडी वढाया बी गवसंना ! पोरास्नी लवंडाया तर जागाच न्हवती. माझ्या खिशांत आपल्या शेताचे कागद व्हते. त्या रामजी पवारानं आपल्या बांधावर नांगूर घातला तुला आठवतं ? त्येचं कागद परत येतां वख्तीं पुन्याला मी वकिलाला दावणार व्हतों. त्ये कागूद मी कसा खटला लढंल म्हून त्या कारकुनाला दावूं लागलों आन् एकदम कडकडकडधा —? ’

‘ अग आईगऽ—’ सारजा भीतीनें अंग शाहारल्यासारखें करून ओरडली. परंतु भागाबाई निश्चल मुद्रेनें हरबाकडे पाहात होती.

आपल्या वक्तृत्वानें श्रोत्याच्या मनावर यथातथ्य परिणाम झाल्याचें दिसतांच वक्ता दुप्पट आवेशानें जसा बोलूं लागतो त्याप्रमाणें हरबा हातवारे करीत पुढें सांगूं लागला, ‘ आन एका खिनांत समदा उलटा पालटा कारभार झाला ! इकडं पोरं वरडत्यात, तकडं बायका माणसं रडत्यात, इकडं म्हातारी मानसं पानी मागत्यात तर तकडं तरणी माणसं लिंबोळयावानीं टपाटप आडवी व्हत्यात ! समदा घोटाळा ! इकडं ठेशन दोन मैल लांब आन तकडं दुसरें ठेशन तीन मैल लांब ! मी डोक्शावर हापटलों. ही बघ इथं खूण दिसती का अजून ? ’

सारजेनें हरबाच्या डोक्यावर हात फिरवून त्यानें दाखवून दिलेल्या जागीं चाचपून पाहिलें. कांहींतरी खडबडीत हाताला लागतांक्षणींच विजेचा झटका बसावा त्याप्रमाणें तिनें झटकन आपला हात काढून घेतला. भागाबाई जागची हालली नाहीं कीं एक अक्षर बोलली नाहीं. हरबा तिच्याकडे एकवार पाहून पुढें बोलूं लागला—' मी तसाच डब्याच्या बाहीर आलों ! उभंबी राहाया गवसत नव्हतं ! झोकांडं जात व्हतं. पर तसाच जिवाचा धडा करून शान उघड्या मैदानाकडं धूम ठोकली. मला काय होत होतं ह्येच मला उमगंना ! माझे पाय लटलट कापत व्हते. तोंडाला कायबी तरी चिकटलयागत वाटत व्हतं. मला मागच्या बाजूनं एका साहेबानं धरलं अन् कायतरी गॉटमॅट क्येलं. आन मी त्याला माझं नांव सांगणार होतों. पर तोंडच उघडना. मी तसाच खाली डोकं धरून बसलों आन जागा झालों तो एका दाकदरच्या दवाखान्यांत.'

' अन् मंग तुम्ही गाडीखाली गवसला असलं खोटंच कशापाई सरकारनं पोष्टांनून आमाला लिवल ? ' भागाबाई कठोर मुद्रेनें म्हणाली.

' आता सरकारला इचाराया होवं तें ! मला त्या दाकदरनं सांगतलं तवां मला एकदम घरची याद आली. माझ्या खिशांतल्या शेताच्या कागदाची मला याद आली. पर जवां मी दाकदरला इचारलं तवां तो मला सांगूं लागला. त्ये कागद इकड धाडल्याचं त्यो मला बोलला. आज हरबा मेल्याची गोष्टबी त्योच मला सांगूं लागला. म्या म्हटलं—' अर भल्या माणसा ! मी मेलों कां जिंदा हाय त्यें मला माहिती कां तुला ? ' तवा समदी हकीकत म्या त्याला सांगितली. तुम्हांला मी म्येलों म्हून कळवल्याचं त्यानं मला सांगितलं तवां मी माझा पटका अन् कोट त्याच्याजवळ मागितला. पर त्यो मला येऊ देईना. रोज मी इकडं येण्यासाठीं हटून बसायचा आन त्यो भला माणूस रोज माझ्या तोंडांत काचेची नळी घालून माझा जाळ पघायचा. चार दिसांमागं त्यानं माझं फाटकं कपडं मला दिलं, आन् पुन्याचं तिकीट दिलं तसा मी टाकोटाक आलों–' हरबानें आपलें भाषण संपवलें.

' सहा महिनं तुमी दाकदरच्या दवाखान्यांत जात व्हता व्हय ! कुठं हाय त्यो दवाखाना ? आन् त्या दाकदरच नांव काय हाय ? ' भागाबाई

शांतपणें म्हणाली. हरबानें चमत्कारिक नजरेनें तिच्याकडे पाहिलें. भागाबाईचा प्रश्न अगदीं साधा सरळ होता. परंतु तिच्या आवाजांत एक कुत्सितपणाची झाक मारत होती ती कुणालाही ऐकवली नसती. जणु काय हें सारें हरबा बनवून सांगत असला पाहिजे अशाच तऱ्हेचा तिच्या प्रश्नाचा रोख होता.

'नागपूरच्या दवाखान्यांतला त्यो दाकदर मला काय माहिती ? त्येच नांव इचाराया मी इसरलोंच कीं—' हरबा बेतानें म्हणाला.

'त्यो असंल तर ना! सहा महिनं फुकट जेवाया घालून, निजाया खाट देऊन वर पुन्याचं तिकिट घेतो म्हंजी हा बरमदेवच असला पायजे.' भागाबाई हरबाकडे तीक्ष्ण नजरेनें आरपार पाहून म्हणाली. आतां मात्र हरबाचें मस्तक खवळलें.

'म्हंजी मी खोटं सांगतुया व्हय! दवाखान्यांत हा मार लागून मी पडलों नव्हतों तर काय मजा माराया मंबईला हिंडून आलों व्हय! मानसानं जरा तरी जीभ हटकून बोलावं—' हरबा भागाबाईकडे पाहात संतापानें म्हणाला.

'तुझं आपलं कांहींतरीच बोलनं! पर मी म्हंते, कुठं कां असेनात धनी! आता आल्याती! दिवाळीला अजून पंधरा दीस हायती. आवंदा लई आरास करायची. मज्जा मजा करायची!' सारजा आपल्या वहिणीला पाठीशीं घालण्याच्या सद्धेतूनें म्हणाली. परंतु भागाबाई आतां माघार घेणार नव्हती.

'संमदं पुरुष असंच आपल्या बाईलीला बनवत्यात! मला ठाव हाय! त्या पुलापल्याडल्या बावानं डोक्सं आपटून समंद्या गिऱ्हांना इचारलं त्यें काय खोटं पडेल व्हय!' भागाबाई सारजेकडे पाहून म्हणाली. हरबा आश्चर्यानें त्या दोघींच्या तोंडाकडे पाहूं लागला!

सारजेनें त्याच्या प्रश्नार्थक मुद्रेकडे पाहून म्हटलें. 'पंचाक्षरी बावा इथं आल्याती. त्यांना इचाराया मी आन् भागाबाई ग्येलतों.' पंचाक्षरी बुवाची कहाणी ऐकून हरबा तर हसून हसून बेजार झाला. आधींच असल्या भविष्याच्या दलालाविषयीं त्याचें फारसें मत अनुकूल नव्हतें. आणि आतां तर त्याला चांगलाच पुरावा मिळाला होता. आपण-मेल्याचें वर्तमान त्या

पंचाक्षऱ्यानें ठासून सांगितलें होतें हें ऐकतांच त्याला कमालीचें हंसूं लोटलें. ‘आन् आतां मी जिंदा हाय ह्ये पघून तर त्याचाच मुडदा पडंल—’ हरबा आपलें हसूं आवरण्याच्या भानगडींत पडला नाहीं. भागाबाई जास्तच गंभीर बनली.

‘दोन महिन्यामागं मला कुत्रं चावलं म्हून त्यानं बजावलं व्हतं. त्याच्या परमानं मी चार दीस घरांत बसून राहिलें म्हून आज पाय शाबूत ठीवून उभी हाये.’ भागाबाई म्हणाली. पंचाक्षऱ्याची हरबा करीत असलेली कुचाळकी तिला मानवत नव्हती हें उघड होतें.

‘हात्तिच्या! त्याच्यांत काय शानपन हाय! घरांत बसून राह्यलांत म्हून कुत्रं चावलं न्हाय्! त्येला पंचाक्षरीबावा कशाला होवा? मीबी सांगंन.’

हरबा पुन्हां हंसूं लागला. आणि आतां सारजाही हसण्यामधें सामील झालेली पाहून भागाबाई खवळली. हरबाचें परत येणें तिला आवडलें नव्हतें पण तें तिला उघड बोलून दाखवणें शक्य नव्हतें. त्यामुळें ती मनांतून धुमसत होती. बरें, परत आला मेहुणा तो तरी पश्चातापानें होरपळलेला असा तरी आहे कां? छे! आल्यापासून तो पंचाक्षरी बोवांची टिंगलच करीत सुटला होता. आणि भागाबाईची तर त्या बोवावर निःसीम श्रद्धा होती. हरबाला लागेल असें कांहीं तरी झणझणीत उत्तर देण्यासाठीं तिची जीभ हालचाल करूं लागली. शेवटीं तिनें हरबाला जवळ जवळ आव्हानात्मक सुरांत म्हटलें, ‘बावांची थट्टा कराया काय जातंया तुमचं? पर गेलं सहा महिनं तुमी कुटं व्हतां अन् काय काय करीत व्हता संमदं संमदं बावाला ठाव हाय!’ तिच्या आवाजांतली ती विलक्षण झार कानावर पडतांक्षणींच हरबा चमत्कारिक मुद्रा करून जागचा उठला.

‘म्हंजी मी खोटं बोलतुया व्हय! सारजा, हा न्याव झाला व्हय? मी सोतां तोंडानं सांगतों हाय त्यें संमद खोटं आन् त्या कुडबुड्याचं खरं व्हय! आर तुमच्या बी अकला कुठं माळरानावर चराया गेल्याती जनुं! मी सांगतों त्यो बाबा खोटारडा हाय. त्याची मी युगत तुमाला उद्या दावतों. उद्यां आपून सर्वे त्याच्याकडं जाऊं. त्यो मला वळखीत नाहीं ह्ये ब्येस हाय! त्येला बळंच सांगा भाबाबाई तुमी कीं मी तुमच्या मावळणीचा पोरटा हाय.

आन् हरबाची गोष्ट विचाराया मी आलों हाय. मग तुमचा त्यो बावा काय म्हणतो त्यें मीच त्याला मुस्कटांत मारून इचारतों—' हरबा आवेशानें म्हणाला.

भागाबाईला मनांतून आनंद झाला. तिला तेंच पाहिजे होतें. हरबा-विषयीं आजपर्यंत तिचें मन कधींच साफ नव्हतें. आपल्या बहिणींशी लग्न करून त्यानें तिला आपल्यापासून दूर केलें हा हरबाचा अपराध ती अजून विसरली नव्हती. त्यातून हरबानें सांगितलेली हकीकत आणि त्या बावानें ग्रहांना विचारून सांगितलेली हरबाची हकीकत यांत फार भेद पडत होता. तिच्या मनानें पक्कें घेतलें कीं हा बेवकुफ इसम या अपघाताचें निमित्त करून सहा महिने मुंबईत मौज उडवून आतां पैसे संपल्यावर परत आला असेल. असल्या नादान नवऱ्याची तूं बाईल आहेस हें तिला सारजेला पटवून द्यायचें होतें. यांत भागाबाईला काय फायदा मिळणार होता राम जाणे! परंतु हा एक सूड होता! हरबानें बहिणीला दूर नेलें याबद्दल हा सूड होता!

दुसऱ्या दिवशीं तांबडें फुटायच्या आंतच भागाबाई रानशेण्या गोळा करण्याकरितां एक फाटकें पोतें आणि मोडकी टोपली घेऊन रानांत गेली. परत येतांना ती पुलाच्या पल्याड थोडा वेळ उन्हाचा ताप सहन होईना म्हणून विश्रांतीसाठीं उभी राहिली. बावाची झोपडी तिला तेथून दिसत होती. नकळत तिचे पाय त्या झोंपडीकडे वळले. बावा पैशाचा कसा तपासून पाहण्याच्या उद्योगांत गर्क होते. कोणीतरी आलें आहे असा संशय येतांच त्यांनीं तो पैशाचा कसा घाईघाईनें बैठकीच्या खालीं लपवून ठेवला. पाटीपेन्सिल हातांत घेऊन तोंडानें पुटपुटायला सुरवात केली. भागाबाई आंत आलेली पाहतांच त्यांचा जीव थोडासा थाऱ्यावर आल्यासारखा दिसला. भागाबाई घाबरलेली दिसत होती. श्रमानें व भीतीनें तिचें कपाळ घामानें डवरलें होतें. तिचा आवाज कापरा येत होता. बावाला आज खोटेंच सांगून हरबाला ह्याची टवाळी करायला आपण मदत करीत आहों ह्या पापाची जाणीव तिच्या मनाला चैन पडूं देत नव्हती. बावाला फसवणें शक्य नव्हतें. आकाशांतल्या ग्रहांना विचारून तो आपला खोटेपणा बाहेर काढील आणि नंतर—नंतर आपल्याला त्यानें शाप दिला तर? ग्रहांना

सांगून त्यांतल्या शनिमहाराजाला त्यानें आपल्या अंगावर सोडलें तर आपल्याला कोण तारील ?

'बाबा, आज मी अन् सारजा सांजच्यापारी येणार आहों. आमच्या मावळणीचा पोरटा बी संगट येणार हाय—' भागाबाई कावऱ्या बावऱ्या मुद्रेनें म्हणाली. बोवानें तिच्याकडे निरखून पाहिलें. धंद्यांत मुरलेल्या त्याच्या डोळ्यांनीं त्याला सांगितलें कीं, 'ही बाई कांहीं तरी लपवून ठेवते आहे. पण भित्र्या स्वभावामुळें ती तें नीट लपवूं शकत नाहीं. काय लपवून ठेवीत असावी ही ? हा—ही युक्ति ठीक आहे.

'भागाबाई, तूं आलीस हें छान झालं. मागच्या खेपेला मी तुला शनिमहाराजांची सूचना देऊन ठेवली होती. त्याप्रमाणें तूं घरांत बसलीस. तुझ्या चांदीच्या पाटल्या मोडून जे कांहीं चार दोन रुपये आले त्याच्या जोरावर मी इकडे होम करून शनिमहाराजाला शांत केला. पण आतां वेळेवर आलीस हें छान झालं. एक दिवसाचा उशीर झाला असता तर मग मात्र माझ्या हातांत ती गोष्ट राहिली नसती.' कावळ्याच्या नजरेनें तिच्याकडे पहात तो बुवा म्हणाला. हें नवीन काय संकट या कल्पनेनें भागाबाई जास्तच घाबरली. तिनें भीतभीत प्रश्न टाकला. बुवा निर्विकार चेहरा करून म्हणाले—'भागाबाई, लवकरच तुझ्यावर संकट येणार आहे. फार मोठें संकट आहे तें. शनिमहाराज, मंगळ, गुरु, म्हणजे सगळे ग्रह तुझ्या रोखानें पळत येत आहेत. आज तूं खरं बोललीस तर मी त्यांना थोपवून धरीन. बोल, तूं माझ्यापासून कांहीतरी लपवून ठेवते आहेस—काय लपवते आहेस ?'

बुवांचा हा आवाज ऐकून भागाबाईनें त्याला साष्टांग दंडवत घातला. भीतीनें तिची बोबडी वळली. तिनें हरबा आल्यापासून झालेली सर्व हकीकत त्यांना सांगितली. 'ठीक आहे बेटा! डॉक्टरपासून अन् बुवापासून असं चोरून ठेवूं नये. तूं जा आतां तुझं संकटं मी पळवून लावतों. पण हें बघ तं इथं आली होतीस हें कुणाला कळतां कामा नये. त्या ग्रहांना जर हें कळलें तर मात्र मला कांहीं करतां यायचं नाहीं.—'

भागाबाई धावतच त्या खोपटाबाहेर पळाली. संध्याकाळीं करकरित तिन्ही सांजेच्या वेळीं हरबा, सारजा आणि भागाबाई तिघेही त्या बुवाकडे

आलीं. वाटेनें हरबाची टकळी सारखी चालू होती. बुवाचा फज्या आणि पाणउतारा करण्याच्या इराद्यानें तो निघाला होता. त्याचें बोलणें जों जों जोरकस येई तों तों ग्रहांच्या भीतीनें भागाबाईच्या काळजाचें पाणी पाणी होई. तिघेही त्या खोपटांत येऊन पोहोंचले. बुवा त्यांची वाट पहात होता. त्याची ती जुन्या पंचागांची चवड, भिंतीवर मांडलेलीं कोष्टकें, शंख, मणी इत्यादि साधन सामुग्री पाहून हरबा थोडासा नरम आला. भागाबाईनें पढवल्याप्रमाणें मावळणीच्या पोरस्याची ओळख करून दिली. बुवानें नंतर कोष्टकें मांडून ग्रहांना आमंत्रण केलें—बोवा बोलूं लागले—, 'काय म्हणतां शनिमहाराज, नागपूर मेलला अपघात झाला? बरं मग? त्यांत ३४ माणसें मेलीं? पण मग हरबा कुठें आहे? तो नागपुरांतच आहे? अपघातांत नव्हता? पाह्यलंत भागाबाई, ग्रहांचं म्हणणं खोटं ठरणार नाहीं. ग्रहांना खोटं बोलून काय मिळणार आहे? मी सगळं ऐकून तुम्हाला नीट सांगतों.' बुवा थोडा वेळ हरबाच्या बाजूनें आरपार पाहात विचार करीत होते व कांहींतरी ऐकत असल्याचा बहाणा करीत होते. हरबाची छाती थोडीशी उडूं लागली होती यांत शंका नाहीं. बोवांच्या रोखून पाहण्यानें तर तो सर्दच झाला होता. तरीपण निष्काळजीपणाचें हास्य तोंडावर आणून तो बळेंच सारजेच्या तोंडाकडे पहात उभा होता. बुवा थोड्या वेळानें बोलूं लागले. 'खरंखोटं तुमचं तुम्ही पहा. पण ग्रहांची ही माहिती आहे. हरबा अपघाताच्या आदल्या दिवशीं एका तमाशांतल्या पात्राकडे नागपुरला रात्रीचा वस्तीला होता. त्याचे कागदपत्र कुणातरी त्याच्याचप्रमाणें वस्ती करून निघालेल्या माणसानें चुकून बरोबर नेले. हरबा रात्रभर मजा करून नागपुरांत नंतर चार आठ दिवस होता. मुंबईला तो आला. तिथं सिमीटाच्या चाळींत तो एक महिनाभर होता. एक सातार्‍याकडची पाटलाची लेक त्याला सोबत करायला महिनाभर होती. नंतर पुण्याला दोन महिने हरबा गणेश पेठेंत मुक्काम ठोकून होता. तिथं एके दिवशीं रात्रीं एका बाईनं तो पैसे म्हणून लोखंडाच्या कांबीनं डोक्यावर मारलं.—' हरबानें घाबरून डोक्यावरच्या वणावर हात ठेवला!

बुवांचे पुढचे शब्द बाहेर पडले नाहींत. त्यांच्यासमोर असलेलीं पंचांगें दूर भिरकावण्यांत आलीं. त्यांची पाटीपेंसिल खोपटाबाहेर जाऊन पडली.

व सारजेनं त्या सर्वांच्या देखत हरबाच्या हाताला असा कांहीं जोराचा हिसका दिला कीं देखते रहे ! सारजा धूम घराकडे पळत सुटली. सारजा पुढें, मागें हरबा व त्याच्यामागें भागाबाई असें हें त्रिकूट बाजारपेठेंतून घरापर्यंत कसेबसे येऊन पोहोंचलें.

सारजा झोपडींत आली ती एका फाटक्या पोत्यावर भिंतीकडे तोंड करून पडून राहिली. हरबानें तिची मनधरणी करण्याचा प्रयत्न खूप केला परंतु हरबानें असल्या बाजारी बायाच्या नादानें सहा महिने गावगन्ना पैसे उधळत फिरावें ह्या कल्पनेनें तिचें डोकें फार बिथरलें होतें. आणि गृहस्थानें डोक्याची जखम अपघातांत झाली म्हणून खुशाल आपल्याला फसवावें ! भागाबाई परत आली तों तिचा चेहरा विजयानंदानें फुललेला दिसत होता. आता शनिमहाराज, मगळमहाराज तिच्या वाटेला जाणें शक्य नव्हतें. बुवानें हरबाचा बदफैलीपणा कसा पण नेमका हेरून काढला होता ! आणि हा गृहस्थ सरळ थापा मारीत होता ! ब्रहांना आजवर कुणी फसवूं शकलं आहे काय ? असल्या बाहेरच्या बायांना जवळ करून पैसा उधळायला पाहिजे. यालाच पुरुषाची जात म्हणतात ? खुद्द भागाबाईच्या पतिराजांनीं तरी काय हेच गुण उधळले होते म्हणून तरी तिला हरबाचा संशय आला ! तिला आनंद वाटला त्याचें कारण हेंच होय ! आतां तरी सारजेला म्हणावं घे आपला नवरा नीट पारखून ! बाया पहात हिंडतो काय ?

‘भागाबाई, ह्ये त्या बावाचं संमद खोटं हाय हो ! तुमी तरी सारजेला थोडं सांगा कीं—’ हरबा कळवळून म्हणाला. भागाबाईनें उत्तरादाखल मानेला झटकारा दिला.

‘मला कशापायीं सागाया सांगतां ? त्या बावाला संमदं ठाव हाय कीं त्यालाच सारजला सांगाया सांगा कीं—’ भागाबाई म्हणाली.

‘भागाबाई, मी गळ्याच्यान् सांगतों असला संशाव तुम्ही घेऊं नका. त्या दाकदरचं नांव मी कुनाला तरी इचारून सांगन’ हरबा दीनवाण्या मुद्रेनें म्हणाला. सारजा इतका वेळ विचार करीत पडली होती. हरबाच्या विनवण्या ऐकून घ्यायला आतां ती राजी नव्हती. सहा महिने रोज संध्याकाळीं ती ह्या माकडासाठीं ओस्यावर उभी राहून जिवाची चाळणी करीत होती ! साऱ्या गावानें आपल्याला या बदफैली माणसाकरतां वेडें म्हटलें

काय ? साऱ्या दुनियेनें आपल्या तोंडांत शेण घातलें तरी आपण आशा सोडली नाहीं, कुणासाठीं ? या चंगीभंगी माकडासाठीं ? जवळ पैसा द्यायला नाहीं. म्हणून पुण्याच्या एका हलकट बाजारबसवीकडून डोक्यावर मारून घेणाऱ्या नराधमासाठीं ? ती स्वतःवर चिडली होती. हरबावर चिडली होती आणि त्या बुबावर चिडली होती. आपल्या नवऱ्याची ही नालायकी आपल्याला कळूं देण्यांत या साऱ्या लोकांना काय मिळालं ? त्यापेक्षां काल आपण रात्रभर किती सुखांत होतों ? तीच रात्र जन्मभर पुरली असती तर ! आतां साऱ्या सासवडांत आपल्या नवऱ्याची नालायकी पसरणार ! आणि यापुढें आपण जगाला तोंड तरी कसें दाखवावें ? ज्या हातानें काल हरबानें आपल्याला स्पर्श केला तो हात आणखी कितीतरी बायकांच्या कुजकट पाठीवरून फिरला असेल ?

विचारासरशीं ती ताडकन् उठून उभी राहिली. काय चाललें आहे हें इतरांना समजण्याच्या आंत तिनें हरबाचे कपडे शोधून एका मळकट फडक्यांत एके ठिकाणीं बांधले. गल्ल्यांत दोन रुपये होते ते तिनें हरबाच्यापुढें ठेवले आणि दरवाजाकडे बोट केलें—

'म्हंजी, सारजा, इचार काय आहे तुझा ?' हरबा आश्चर्यानें तिच्या तोंडाकडे पहात म्हणाला.

'जा ! गुमान रस्ता पकडा ! मोटरीकरतां भाड्याला हे पैसे घ्या आन् तोंड दावूं नगा पुन्हां—" सारजा संतापानें थरथर कापत म्हणाली. भागाबाईचा आनंद तिच्या डोळ्यांत मावत नव्हता ! तिनें आपल्या बहिणीकडे आनंदातिशयानें पाहिलें. ग्रहांचें संकट हें असें टळणार होतें तर ? हरबा हातांतल्या पैशाकडे थोडा टक लावून पहात होता. विचार करीत असतां तो एकदम मोठ्यानें हंसला. सारजा जास्तच चिडून म्हणाली—

'मुर्दाडावानी हसताया ! पर सारजेचा राग तुमास्नी तसा कळायाचा नाहीं. पुन्हां सांगते, गुमान मुकाट्यानं जातां कीं—'

'जातों. पर एक गोष्ट राह्यली. त्या बावाला तुम्ही काईबी म्हणालात तरी संमदं कांहीं बराबर वळखतां आलं नाहीं. नागपुरांत मी एका बाईच्या घरांत वस्तीला होतो काय ? आरइच्या आतां काय म्हनूं या गिऱ्हांना ! आर भिस्यानो, नागपुरांत हा पठ्या तीन घरांत व्हता. एका घरानं

मर्दाची तहान भागंल व्हय ! आन् मंमईला साताऱ्याची व्हती ! पर सोलापूरची व्हती ती कुठं ग्येली ? आन् पुण्यांत तर अक्षी राजावानी रोज न्यारं घर ! मर्दाला ह्ये समंद पाहिजेच—' हरबा जोरजोरानं हसूं लागला.

सारजा आश्चर्यानें त्याच्या तोंडाकडे पाहूं लागली. अवसानांत येऊन हरबा पुढें बोलूं लागला,—'सारजच्या लग्नाला आंवदा शिमग्यांत चार वर्सं व्हत्याल ! पर त्येच्या आधीं ती विटी मंगळवेढेकरीन तिचं बी जोडं म्या खाल्लंत कीं, त्ये कुनालाच कसं समजलं नाय ?' भागाबाई त्या नराधमाकडे जळत्या नेत्रानें पाहात होती. आणि या मांगानें आपल्या बहिणीचा गळा कापला !

'आतां तर काय ! समद्या गांवांतल्या उनाड मैना माझ्या रान्याच ! बरं झालं ! कटकट गेली—' म्हणून म्हणत हरबा कपड्याचें गाठोडें खांद्यावर टाकून जाण्याकरतां दरवाजाकडे पाहूं लागला. विजेच्या वेगानें सारजा त्याच्याकडे धावत गेली. त्याच्या हातांतील गाठोडें तिनें दूर कोपऱ्यांत भिरकावलें. भागाबाईच्या देखत हरबाच्या गळ्याला मिठी मारून ती रडत रडत म्हणाली, 'धनी, समंद खोट हाय ! मला काय तुमचं मन वळखत नाय व्हयं ? कुनातरी चांडाळानं तुमचा आन् माझा घात कराया समदं उठवलं हाय—! माझ्या बिगर तुमी कुठं बी जानार नाय, मला ठाव हाय त्यें—'

हरबानें मोठ्या प्रेमानें सारजेच्या पाठीवरून हात फिरवला !

'हा. ही माजी खरीखुरी सारजा होय ! पर मी म्हणतों हा कोण चांडाळ कां चांडाळीण समद उठवतीया तिचं तंगडं उद्या मी मोडून टाकतो ! अर काय, हाय काय आन न्हाय काय ! इकत्या बायल्या जवळ करायला मी काय शिकलेला मानूस हाय व्हय ? माझी सारजा एकच पन लाखाला भारी हाय ह्ये मला ठाव नाय व्हय—! भागाबाई—आर आन् भागाबाई कुठं ग्येली ?

हरबानें पुढें काय केलें तें पाह्याला भागाबाई त्या खोपटांत हजर नव्हती—!

---

## झेबुन्निसा संगीत विद्यालय : : ९

पावसाळयांत रस्त्याच्या कडेला ज्याप्रमाणें छत्र्यांचें आडमाप पीक उगवतें त्याप्रमाणें मुंबईंत आजच्या घटकेला संगीत विद्यालयें रस्तोरस्तीं उपटलेलीं दृष्टीस पडतात. पावसाळयांतील छत्र्याप्रमाणेंच कांहीं काळ मोठ्या डौलानें त्या विद्यालयाच्या पाट्या झळकत असतात आणि कालांतरानें त्याच ठिकाणीं एखादें न्हाव्याचें नाहीतर वाणगटाचें दुकान आलेलं आपणांस आढळून येतें. प्रत्येक विद्यालयाचा रुबाब तें जिवंत असेपर्यंत इतका दृष्टींत भरण्याजोगा असतो कीं, क्षणभर त्रयस्थाला मुंबई शहर देवी सरस्वतीच्या वीणाझंकारावर डोलत असावें असा भास होतो. आणि इतक्या कलामय मुंबई शहराला इतर लोक 'बाजारी, मवाली, आधाशी' लोकांचें आगर म्हणून संबोधितात तें साफ चूक असलें पाहिजे असें वाटूं लागतें. खरोखरी काय परिस्थिति आहे हें खुद्द मुंबईकर इसमाला सुद्धां पुष्कळ वेळां माहीत नसतें.

झेबुन्निसा संगीत विद्यालय आज दीड वर्ष त्या जागेंत अक्षरशः गाजत होतें. विद्यालयाच्या मुख्य चालिका किशोरीबाई अष्टोप्रहर आपल्या ज्ञानांतील छटाक, अदपाव ज्ञान विद्यार्थीनींना देण्यांत सारख्या गुंतलेल्या असायच्या. विद्यालयाच्या कार्याविषयीं साऱ्या दादरमध्यें लोकांच्या मनांत कौतुकमिश्रित आदर उत्पन्न झालेला होता. किशोरीबाईच्या कलामय बोलण्यानें,

कलायुक्त वागण्यानें एकदां विद्यालयाच्या तबेल्यांत शिरलेला इसम त्यांची आरती गात बाहेर आला नाहीं असें झालें नाहीं. कुणी, केव्हांहि वेळ ठरवून त्यांना भेटायला जावो, किशोरी तंबोऱ्याच्या तारा लावण्यांत किंवा तबल्याच्या खुटया ठोकण्यात गर्क झालेली दिसायची ! घटकाभर बातचीत केल्यावर आपल्या मुलीला विद्यालयांत घालूं इच्छिणारा पालक स्वतःला बंदी कां असावी या खिन्न विचारानें त्या तबेल्यांतून बाहेर पडायचा.

विद्यालयाला आजवर भेटी दिलेल्या इसमांच्या नांवांची नुसती यादी पाहूनच मनुष्य स्तंभित व्हावयाचा. व्हिजीटर पुस्तकांत रावसाहेब, रावबहादूर, सर इत्यादि पदव्यांची खुर्दासारखी खैरात केलेली पाहून माणसानें पुढें बोलावें तरी काय ? चौकशी करणारा इसम फार फार झालें तर ट्रामवे कंपनींत १५० ते २०० मिळवणारा एखादा भुक्कड भाऊ महाराज असावयाचा. त्याला हीं मोठमोठीं नावें म्हणजे राणीच्या बागेंतल्या सिंह—वाघाप्रमाणें भयंकर वाटावयाचीं यांत नवल काय ?

किशोरीनें विद्यालयाची माडणी तर मोठी सुबक केली होती. खालच्या माळयावरची ती आजवर जवळ जवळ रिकाम्या खोक्यांनी भरलेली ती आडगळीची खोली होती हें सांगून सुद्धां कुणाला खरें वाटलें नसतें. त्या खोलीला रंगरंगोटीच्या सहाय्यानें, खिडक्यांना लावलेल्या झुळझुळित पडद्यानें व भिंतीवर टांगलेल्या चित्रांच्या योगानें एखाद्या दिवाणखान्याचें स्वरूप आणलेलें होतें. सर्व खोलीभर काथ्याच्या तरटानीं जमीन झाकून घेतली होती. त्यावर हिरव्या रंगाची एक जाडजूड सतरंजी हांथरण्यांत आली होती आणि बैठकीच्या गाद्या, लोड, तक्के, गालिचे इत्यादि सामान अशा कलापूर्ण रीतीनें विखरून देण्यांत आलें होतें कीं, पहाणारा सर्दच व्हावा. जुन्या थाटाच्या जोडीला नव्या पद्धतीचे कोच, तिपाया, खुर्च्या यांचीहि रेलचेल होती. मधोमध समोरच्या भिंतीच्या मध्यभागीं किशोरी नेहमीं अनंताकडे लक्ष लावून एकाग्रतेनें कलेचें चिंतन करण्यांत गर्क झालेली दिसे. सुदैवानें या संगीती पेशाला सर्वस्वी अनुकूल अशी किंचित् स्थूलयष्टी तिला प्राप्त झाली होती. ठेंगणा ठुसका डौलदार बांधा, गोल चेहरा, टपोरे डोळे, सरळ नाक, अगदीं मुद्दाम बनवून घेतलेल्या कवळ्यांप्रमाणें भासणारी रेखीव दतपंक्ती आणि त्यावर मायेची पखरण करणारे

लालबुंद ओठ, गौरमांसल बाहु इत्यादि कल्पना केली कीं किशोरीची मूर्ति सहज डोळ्यापुढें उभी राहील. किशोरीमुळें त्या हॉलला शोभा आली होती कीं हॉलमुळें किशोरीला शोभा आली होती हें ठरवणें जरा कठीणच होतें. एवढें मात्र खरें कीं, त्या दोघाना एकत्र पाहिलें कीं, समसमां संयोग कीं जाहला या वचनाची आठवण झाल्याशिवाय राहती ना !

दीड वर्षांत किशोरीनें दादरकरांना संगीत विद्येचें महत्त्व पटवून देण्याचा चग बांधला होता. विद्यालयाचा गाजावाजा करण्यासाठीं यत्किंचितहि कसूर केली नव्हती. अर्थात् कांहीं लोकांना 'गाजावाजा' या शब्दप्रयोगामुळें जरा बिचकल्यासारखें होईल. परंतु हें युग जाहिरातीचें आहे. तुमच्या जवळ अस्सल शंभर नंबरी सोनें असलें तरी जगाला तें कळायचें कसें ? जगापुढें तुम्ही आपले गुण मांडून ठेवल्याशिवाय जगानें तरी तुमचें कौतुक करावें कसें ? किशोरीचें तर स्पष्ट मत होतें कीं, जगाला कोणतीहि गोष्ट बळेंबळें पटवून द्यावी लागते. जग म्हणजे कुंभकर्णाचा अवतार असतें. त्याला मोहनिद्रेतून जागें करावें लागतें. जगाला म्हणजे दादर विभागांत राहणाऱ्या सुखवस्तु लोकांना जागें करण्याकरितां किशोरीनें विद्यालय उघडल्याच्या आठव्या दिवशीं एका उत्तरेकडच्या बाईच्या गाण्याचा कार्यक्रम उरकून घेतला. तिसऱ्या महिन्यांत विद्यालयातील तीन विद्यार्थीनींचें स्नेहसंमेलन घडवून आणलें. आणि स्नेहसंमेलनें भरविण्याची प्रथा नंतर दर तीन महिन्यांनीं उरकण्यांत येऊं लागली.

किशोरीचे हे प्रसिद्धीचे मार्ग कोणास रुचोत वा न रुचोत विद्यालय विद्यार्थीनींनीं गाजूं लागलें यांत मात्र तिळमात्र शंका नाहीं. प्रत्येक विद्यार्थीनीचा पालक दोन महिने झाले कीं, मुलगी स्नेहसंमेलनाकरितां जादा पैसे मागते हें पाहून खाडकन् शुद्धीवर यायचा. आणि मुलींना कांहीं तरी न छापण्याजोगें उत्तर देणार तोंच किशोरीच्या त्या डौलदार बांध्यांची त्याला आठवण व्हायची आणि नंतर कांहीं एक कुरकूर न करतां तो पैसे काढून द्यायचा. किशोरीनें लोकांकडून काहीं ना कांहीं निमित्तानें पैसे उकळण्याचा राजरोस धंदा चालवला आहे असें चावट लोक खुशाल म्हणोत, कोणत्याहि सूज्ञ म्हणविणाऱ्या विचारवंत नागरिकानें एवढा विचार करायला नको कीं बुवा, दोन महिन्यांत शिकवलेलें संगीत कितपत अंगांत

मुरलें आहे हें परीक्षा घेतल्याशिवाय कसें समजणार ? बरें, परीक्षा म्हटली म्हणजे ती ताटांतलें वाटींत अन् वाटींतलें ताटात असें होऊन कसें भागेल? किशोरीचा एक भाऊ गिरगांवांतल्या रहिवाशांना संगीत चाखायला शिकविण्याचा गंडा बांधून बसला होता तो मुद्दाम गिरगांवांतून दादरला एक दिवस यायचा. मुलींची शास्त्रोक्त त्रयस्थामार्फत कडक परीक्षा व्हावयाची आणि मग मुलींना त्याच्या सूचनेवरून स्नेहसंमेलनाचे दिवशीं प्रशस्तीपत्रें मिळावयाची. आतां हा एवढा खटाटोप उरकायचा म्हणजे खर्चाशिवाय कसें भागावयाचें ? अर्थात् विद्यार्थीनींनीं दर दोन महिन्यांनीं परीक्षेची पाच रुपये फी देऊन परीक्षेला बसलेच पाहिजे हा नियम किशोरीला करावा लागला. परीक्षकाला जाण्यायेण्याचें फर्स्टक्लासचें भाडें, त्याचा मेहताना इत्यादि खर्चाकरतां पांच रुपये फी सुद्धां अपुरी पडत असे असें किशोरीचें म्हणणें होतें. परंतु सत्कार्याकरतां थोडीशी झीज सोसायची तिची तत्परता पाहून विद्यार्थीनी सुद्धां थक्क व्हायच्या !

कांहीं लोक मधून मधून तक्रार करीत. खर्च फार होतो, स्नेहसंमेलनं दर दोन महिन्यांनीं कशाला ? त्यापेक्षा शाळांतील परीक्षांप्रमाणें दर वर्षी परीक्षा घेण्यांत यावी अन् त्याचवेळीं एक संमेलन भरवून प्रशस्तीपत्रें देण्यांत यावीं, असें लोकांचें म्हणणें होतें. परंतु लोकांना सूचना करायला काय कष्ट पडतात ? आणि इतर शाळा व संगीत विद्यालय यांच्यांत तुलना करणें खरें आहे कां ? संगीत कला म्हणजे काय भूगोलाप्रमाणें पाठ करून कधीं येईल का ? पुस्तकी ज्ञान आणि कलेचें ज्ञान यांत महदंतर आहे ! तक्रार करणाऱ्या पालकांना किशोरीनें समक्ष खुलासा करून दिला. संगीत ही कला अशी आहे कीं ती वारंवार तपासून घेतली पाहिजे. विद्यार्थिनीची एकादे वेळीं लय वाढते, एकादी विद्यार्थिनी सुराला कच्ची असते— अहो, अनेक भानगडी त्यांत असतात. तेव्हां परीक्षेची कसोटी ठेवल्याशिवाय गायनाची कला कंठगत होणें शक्य तरी आहे का ?

यावर बिचारा पालक आपल्या पाल्याच्या कंठाकडे पाहून स्वतःचा कंठ हातानें चाचपून पाहात बाहेर पडे. पण त्याला किशोरीचें म्हणणें पटे. एकंदरींत दादर विभागांत झेबुन्निसा संगीत विद्यालयानें आपलें बस्तान चांगलें बसवलें होतें. दीड वर्षाच्या अल्प काळांत किशोरीनें विद्यालयाचें

नांव सर्वतोमुखीं करून. सोडलें होतें, आणि त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें काय होतें ?

मुंबईत असा एक वर्ग आहे कीं त्याला कामाच्या रगाड्यापुढें स्वतःच्या पत्नीशीं बोलणें सुद्धां महिना महिना शक्य नसतें. पैसा मिळविण्यासाठी माणसाला धडपड करणें भाग आहे. अशा वेळीं घरांतल्या मुलीनें गायन क्लास जॉईन केला कां सिनेमा स्टुडियोंत जाऊन नाचायला आरंभ केला हें जन्मदात्या पित्याला सहा सहा महिने टाऊकही नसतें. आणि सहा महिन्यानीं समजलेंच तर मुलीला ताकीद द्यायला त्याला वेळ मिळेल तर ना ? आणि एखाद्या रविवारीं मुलीची व बापाची गांठ पडण्याचा कपिलाषष्ठीचा योग जमून आलाच तर इतके दिवस कामाच्या ओझ्याखालीं थकलेला, वाकलेला जीव एका रविवारीं मोठ्यानें बोलण्याइतका सुद्धां उत्साही नसतो. तो मनांत समजतो कीं जग बदललें आहे. जाऊं दे ! कांहीं का होईना ! एक दिवस सुखांत घालवायला मिळायचा त्यांत आरडाओरड अन् चिडाचीड पाहिजे कशाला ? आणि या कारणांमुळें मुंबईतील अनेक संगीत विद्यालयें दर दोन महिन्यांनीं स्नेहसंमेलनें घडवून आणू शकतात !

किशोरीनें झेबुन्निसा संगीत विद्यालय आपल्या गिरगांवांतल्या भावाच्या साहाय्यानें स्थापन केलें. स्थापन करण्यापुरती तिनें भावाची मदत घेतली. परंतु पुढील प्रगति मात्र तिनें स्वतःच्या करामतीवर करून दाखवली. मधून मधून एखादी फाजील जिज्ञासू मुलगी तिच्या विद्यालयांत प्रवेश करी, नाहीं असें नाहीं. परंतु किशोरी प्रथम तिला युक्तियुक्तीनें ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करी आणि या उप्परही तिची जिज्ञासा शमण्याचें चिन्ह दिसलें नाहीं तर ' तुला संगीताचें अंगच नाहीं. तूं आपली भरतकामाच्या किंवा शिवण कामाच्या कॉलेजांत जात जा ' म्हणून ती अत्यंत गोडीनें तिला वाटेला लावी. अशीच एक मुक्ता नांवाची मुलगी मोठी चपळ होती यांत शंका नाहीं. चार आठ दिवस तिनें किशोरच्या लंब्या लंब्या बाता खालच्या मानेनें ऐकून घेतल्या. तेवढ्या वेळांत तिनें काय समजावयाचें तें समजून घेतलें व आदल्या दिवशीं तिनें अचानक प्रश्न टाकला—!

" कायहो बाई ! आमचे काका म्हणत होते कीं, तुम्ही इतक्या चांगल्या संगीत शिकलेल्या अन् रेडियोमध्यें तुमचा कार्यक्रम कधींच कसा झाला

नाहीं ?" किशोरीनें चमकून त्या मुलीकडे पाहिलें. मुक्ता बावळट चेहरा करून उत्तराची वाट पहात उभी होती. किशोरीनें एकवार गोड हास्य करून म्हटलें, "तुझ्या काकांना म्हणावं, रेडियोमधें जाऊन पोट भरण्याची माझी तयारी नाहीं. रेडियोमधें गाणारीण मी नाहीं."

"कां ? त्यांत कमीपणा कसला आला आहे ? हिराबाईसुद्धां रेडियोमधें मधून मधून जातात. झालंच तर, केसरबाई अन् सरस्वतीबाई—कित्ती कित्ती चांगल्या स्त्रिया नेहमीं रेडियोमधें गात असतात. आमचे काका तर म्हणत होते कीं रेडियोमधें गाणाऱ्याची तयारी चांगलीच असावी लागते—" मुक्ता हट्टीपणानें म्हणाली.

"हें बघ मुक्ता, तूं अजून लहान आहेस. तुला या भानगडी कळा-यच्या नाहींत." किशोरी लटक्या गंभीरपणानें म्हणाली.

"पण त्या मला समजावून सांगा नं !" मुक्ता जवळ जवळ हटून बसलेली पाहाताच किशोरीनें मुद्यास बगल दिली.

"मुक्ता, काल तुला सारीगम दिलं होतं तें बसलं का पाहूं बरं—"

"बाई ! मग ग्रामोफोन कंपनीनं तुमचीं गाणीं अजून कांहो घेतलीं नाहींत ?" मुक्तानें थोड्या वेळानें पुन्हां प्रश्न केला !

"त्यांचें माझं पटणं शक्य नाहीं. धंदेवाईक लोकांना आम्हीं कलावान् लोक आपली कला विकायला केव्हाही तयार नसतों" किशोरीनें उत्तर केलें.

"मग आजवर ज्यांनीं आपलीं गाणीं ग्रामोफोन कंपनीला दिलीं ते सगळे मूर्ख का ?" मुक्तानें पुन्हां प्रश्न केला !

"ते मूर्ख आहेत असं आपण कसं म्हणावं ? फार झालं तर एवढं म्हणूं शकूं कीं त्यांना आपल्या कलेचें पावित्र्य उमगलें नसावें." किशोरी घाईघाईनं म्हणाली.

"पण बाई ! आमचे काका नेहमीं म्हणतात कीं तुम्हीं इतकीं स्नेह-संमेलनं केलीत पण नेहमीं गायला दुसऱ्या कोणाला तरी बोलावतां ! तुम्हीं स्वतःच एखादे वेळीं कांहो गात नाहीं ?" मुक्ताच्या बोलण्यांत खवचट-पणाचा कितपत भाग आहे हें किशोरी अजमावून पाहात होती. थोड्या वेळानें ती हसल्यासारखें करून म्हणाली, "हा वेडे ! मी तर काय रोजचीच

आहे! स्नेहसंमेलनं ही तुम्हां मुलींकरतां असतात. रोजरोज तुम्ही माझ शिकवणं पाहातांच, तेव्हां दोन महिन्यांतून एकदां तरी तुम्हाला बाहेरच्या नावाजलेल्या गवयाचं गाणं ऐकायला नको कां? संगीत हें ऐकून ऐकून येत असतं."

मुक्ता थोडा वेळ गप्प होती. ही पोरटी आतां थांबवली नाहीं तर आणखी कांहीं तरी विचित्र प्रश्न विचारील या भितीनें किशोरी एकदम मधेंच म्हणाली— "हो! बरी आठवण झाली. मुलींनो, येत्या रविवारीं आपण जुहूला जायचं बरं का—"

आणि तयारी कोणी कोणी काय काय करावयाची यांत सगळ्याजणी चूर होऊन गेल्या! आठ दिवसांनतर मुक्ता पुन्हां म्हणून विद्यालयांत दिसली नाहीं. किशोरीचें विद्यालय कित्येक संकटांतून तावून सुलाखून बाहेर पडलें होतें. कित्येक विद्यार्थीनींना मधून मधून बाईच्या विषयीं कुतुहल निर्माण होई. कित्येक जणीं धीटपणानें त्यांना त्या दृष्टीनें चाचपून पाहूं लागत. परंतु किशोरी त्यांना स्वतःसंबंधीं फारसा पत्ता लागूं देत नसे. मुलींना एवढेंच माहीत होतें कीं कलाप्रेमामुळें किशोरीबाई लग्नाच्या नसत्या फंदांत पडलेल्या नव्हत्या. संगीताच्या अष्टौप्रहर ध्यासामुळें त्यांना विवाहाचा विचार करायला सवडच मिळाली नव्हती. इतकें जाज्वल्य कलाप्रेम हल्लींच्या युगांत क्वचितच पाहायला मिळतें. बावळट मुली सहजच फसत म्हणा!

—आणि हें झेबुन्निसा विद्यालयाचें ढोंग आणखी किती दिवस चाललें असतें कुणास ठाऊक! परंतु मध्यंतरी एक बनाव घडून आला आणि—पण तेंच आतां आपण पाहणार आहों!

विद्यालय स्थापन झाल्यापासून पुरे पंचवीस महिने होणार होते. इतर ठिकाणीं रौप्य महोत्सव वर्षांवर ठेवतात. परंतु किशोरीची महत्त्वाकांक्षा तिला तो उत्सव महिन्यांवर ठेवावा असें आग्रहानें सुचवूं लागली. पंचवीस महिने सतत उत्सव साजरा करावा असें तिच्या मनानें घेतलें. बंधुराजांना तिनें गिरगावांतून बोलावून घेतलें. त्याच्या कानावर ही सारी हकीगत तिनें घातली. बंधुराज बहिणीची ही धडाडी पाहून प्रथम सुन्नच झाले. परंतु बहिणीच्या आग्रहाखातर सारी व्यवस्था करण्याचें त्यांनीं आश्वासन

दिलें. सर्व काहीं व्यवस्था एक दोन तासांच्या विचारविनिमयानतर मुक्रर झाली. शेवटीं महत्त्वाचा प्रश्न आला कीं या प्रसगाला अध्यक्ष म्हणून कोण बळी देण्यासाठीं बोलवावा? रौप्यमहोत्सवाचा अध्यक्ष जितका श्रीमंत असेल तितकाच तो बावळटही असला पाहिजे. त्याकडून हजार पांचशेची देणगी उपटायला मिळाली तर ठीक. अनेक नावें त्यांनीं विचारांत घेऊन पाहिलीं. परंतु बावळट श्रीमत मुंबईत शेंकड्यावारी असता त्यांना यापैकीं एकहि पसंतीस येईना. कांहीना कांही अडचण पुढें येई. सगळे गुण जमले तर पूर्वी केव्हां तरी तो येऊन गेलेला असे आणि एकदां जागे झालेल्या इसमाला पुनः बनविणें सोपें नसतें एवढें जाणण्याइतकी अक्कल त्यांना खासच होती. शेवटीं कंटाळून किशोरीचा भाऊ म्हणाला, " हें पहा, ही माझ्या हातांत टेलिफोन डिरेक्टरी आहे. यांतलीं नांवं मी आतां वाचतों. जें नांव तुला भरंवशाचं वाटेल त्या गृहस्थाला आपण अध्यक्ष नेमून टाकूं— "

किशोरीनें फारसा विचार न करतां चटकन् होकार भरला. आणि इथेंच तिनें सर्व नाशाचा पाया खणून घेण्यास मदत केली. इंग्रजी पहिलें मुळाअक्षर संपून दुसऱ्यास सुरवात झाली तरी आतांपर्यंत वाचल्यापैकीं एकही अध्यक्ष या नात्यानें किशोरीला पसंत पडलें नाहीं. ओठांचा झालेला चंबू आणि कपाळावरील आठ्यांचें जाळें हीं दोन्हीं लक्षणें ठीक नव्हतीं. बॅंकेचें सदर चाललें होतें. एका नांवानें किशोरीचें लक्ष चटकन वेधून घेतलें. सर्वोत्तमराव सुखात्मे हें नांव तिला कां कुणास ठाऊक पूर्वी कोठें तरी ऐकल्यासारखें वाटूं लागलें.

" मग त्यांनाच बोलवूं या. म्हणजे पूर्वीची ओळख निघालीच तर हक्कानें देणगी उपटायला बरंच झालं—" बंधुराज कंटाळून डिरेक्टरी मिटून म्हणाले,

" पण हें नांव कुठें तरी ऐकल्यासारखं वाटतं आहे. बॅंकेचा मॅनेजर आहे काय? बहुतेक श्रीमंत असेलच. तरी पण तूं गिरगावांत कुणाकडून तरी बारीक चौकशी करून पहा. श्रीमंत असेल अन् बावळट असेल तर हाच आपला अध्यक्ष कायम " किशोरी विचार करीत म्हणाली.

—आणि एक दिवसाच्या चौकशीनंतर कळून आलें की सर्वोत्तमराव ही व्यक्ति मुंबईच्या शेअर बाजारांत एक बडें प्रस्थ होतें. मुंबईला मलबार

हिलवर त्यांचा एक भव्य प्रासाद होता. अहमदाबादेंत एका गिरणींत त्याचा बराच संबंध होता. शिवाय दादरला हिंदु कॉलनींत त्यांचीं घरेदारें होतीं. तीं पाहणें त्रासदायक होऊं लागल्यामुळें त्यांनीं विकून टाकलीं होतीं. एकंदरीनें आसामी वजनदार होती. म्हणजे [illegible] आजवरच्या सन्माननीय पाहुण्यांमध्यें पहिल्या रांगेंत शोभणारी होती. किशोरीला तरी आणखी काय पाहिजे होतें?

अध्यक्ष मुक्रर झाला. अध्यक्षांची गांठ घेऊन त्यांना विनंति करणें एवढेंच बाकी राहिलें. अध्यक्षांची गाठ घेणें सोपें नव्हतें हें एका दिवसाच्या रखडपट्टीनंतर त्या बंधुभगिनींना कळून चुकलें. शेवटीं त्यांच्या बंगल्यावर एक पत्र ठेवून किशोरीला परत यावें लागलें. दुसऱ्या दिवशीं पोस्टानें अध्यक्षाची संमति आलेली पाहतांच तिला अस्मान ठेंगणें वाटूं लागलें. रौप्यमहोत्सवासारखा महत्त्वाचा प्रसंग आणि त्याला साजेशी महत्त्वाची व्यक्ति अध्यक्ष म्हणून मिळणें म्हणजे विद्यालयाचा विजय होता, किशोरीच्या कर्तृत्वावर हा विजयाचा मुगूट होता.

समारंभाची तयारी करतांना पैशाकडे पाह्यचें नाहीं हें धोरण ठरल्यासारखें झालें होतें. नेहमींच्या मामुली स्नेहसंमेलनाला पांच रुपये वर्गणी पुरी होत असे, म्हणजे भागवून घेतां येत असे; परंतु रौप्यमहोत्सवाला निदान दहा रुपये वर्गणी अवश्य यायला पाहिजे. एके दिवशीं विद्यार्थिनींच्या मेळाव्याला उद्देशून किशोरीनें स्फूर्तिप्रद भाषण केलें. विद्यालय ही सगळयांची माता होय. मातेकरतां जो प्राणी तन मन आणि विशेषतः धनानें झीज सोसतो त्याला कोणत्या दिव्य आसनावर नेऊन ठेवतात हा तिच्यापुढें प्रश्नच पडला होता. मुलींनीं या वेळीं मागें घेतां कामा नये. विद्यालयाचा लौकिक म्हणजेच विद्यालयांतील प्रत्येक विद्यार्थिनीचा लौकिक होता. भावनातिरेकानें पाणावलेल्या नेत्रांनीं किशोरीनें मुलींना पैसा गोळा करण्याविषयीं विनंति केली. स्वतः किशोरी काही कमी पडलें तर आर्थिक झीज सोसायला तयार होती.

समारंभाचा मुख्य भाग इतर ठिकाणीं घडून येणाऱ्या समारंभाप्रमाणें व्यवस्थित पार पडला. रविवारीं सकाळपासून ते सोमवारीं संध्याकाळपर्यंत सारखे कार्यक्रम एका पाठोपाठ लागलेले होते. रविवारीं रात्रीं मुलींचा

गर्बा नाच एका थिएटरांत घेण्यांत आला. कार्यक्रम खरोखरीच कौतुकास्पद रीतीनें पार पडले. मुख्य अध्यक्ष सुद्धां साग्रच्या पसंती—निदर्शक माना डोलवीत होते. त्यांना किशोरीची कार्यक्षमता पाहून अत्यंत अचंबा वाटल्याचें त्याच्या बोलण्यात आलें. मध्यंतरीं एकदां तर त्यांनीं किशोरीबाईना स्वतःला एकादी चीज गाऊन दाखविण्याबद्दल आग्रहही केला. किशोरीनें घमा बरोबर नसल्याचें निमित्त करून त्यांची विनंति मोठ्या मिनतवारीनें त्याना परत घ्यायला लावली. परंतु सारा कार्यक्रम उरकेपर्यंत एक गोष्ट कोणाही व्यवस्थाला जरा नवलाची वाटली असती ती ही, कीं इतक्या कामाचा हा गृहस्थ आपले सगळे उद्योग गुंडाळून ठेवून किशोरीच्या कार्यक्रमांत इतका गुंग होतो म्हणजे काय !

किशोरीनें पाहुण्यांची बडदास्त अत्यंत उदारपणानें ठेवली होती. तिच्या व्यवस्थेंत नांव ठेवायला एवढीशी सुद्धां जागा नव्हती. सर्व लोक खूप होते. विशेष : सर्वोत्तमराव तर तिच्या वाखाणणीशिवाय तोंडांतून अन्य शब्दच काढीत नव्हते. किशोरी मनांतून एकदम खूप होती. आतां विद्यालयाला कीर्ति आणि देणगीचा पैसा याला काय कमतरता पडणार होती? सर्वोत्तमराव जरा चुळबुळ करू लागले, कीं तिला नक्की वाटावें, कीं चेकबुकाकरतां त्यांनीं खिशांत हात घातला वाटतें! वेळ पडली तर अडूं नये म्हणून तिनें स्वतःचें फौंटन-पेन मुद्दाम दिसेल अशा बेतानें ब्लाऊझच्या वरच्या बाजूस लटकावून ठेवलें होतें.

परंतु किशोरीची पैशाच्या बाबतींत निराशा व्हावयाची होती. पाहुण्यांकरतां अभिप्रायासाठीं ठेवलेल्या पुस्तकावर सर्वोत्तमरावांनीं सोमवारीं संध्याकाळीं मोटारींत पाऊल ठेवतांना अतिशय उत्तम अभिप्राय दिला. पैसा देण्याचें त्यांच्या मनाला शिवल्याचेंहि दिसलें नाहीं. मोटार निघून गेल्यावर किशोरी चिडलेली मुद्रा करून विद्यालयाच्या जागेंत परत आली. बंधुराजांनीं उत्सुकतेनें 'कितीचा आंकडा' म्हणून घाईघाईनें प्रश्न केला.

" हं: ! शेवटीं दक्षिणी मनुष्य जातीवर गेल्याशिवाय राह्यचा नाहीं." किशोरी आंबट तोंड करून म्हणाली.

" म्हणजे? हजाराचा आंकडा नाहींच कां? बरं पण पांचशे तर पांचशे—पुन्हां केव्हां बरी " बंधुराज सांत्वन करण्याच्या उद्देशानें म्हणाले.

" वेडा आहेस ! एक शिवराईसुद्धां त्या मख्ख माणसानं दिली नाहीं. दोन दिवस चांगलं खाल्ला, प्यायला अन् खाणावळीचं बिल सुद्धां द्यायचं त्याच्या मनांत आल नाहीं–आणि आपण काय खर्च केला होता समारंभासाठीं !" खर्चाची आठवण होऊन खिन्न मुद्रेनें किशोरी उद्गारली.

—परंतु दुसऱ्या दिवशीं दुपारच्या प्रहरीं ती एकटीच विद्यालयांत पडलेली असताना तिनें मोटारचा हॉर्न बाहेरच्या बाजूस वाजलेला ऐकला. प्रथम तिनें लक्षच दिलें नाहीं. परंतु दोन तीनदां सारखा आवाज आल्यामुळें कुतूहलानें ती खिडकीपाशीं आली–आणि आश्चर्यानें तिचा झोक जाण्याचा बेत आला.

सर्वोत्तमराव स्वत: गाडी घेऊन आलेले तिला दिसले. काय करावें, या विचारात ती क्षणभरच घोटाळल्यासारखी दिसली. परंतु देव कोणत्या रूपानें उभा राहतो याचा नियम नसतो म्हणून म्हातारी माणसें म्हणतात त्याची तिला आठवण झाली. ती घाईघाईनें त्यांच्या स्वागतासाठीं पुढें धांवली– !

सर्वोत्तमराव आंत आले. किशोरी आपलें सहज वाटणारें ढोंगी हास्य करीत त्यांच्या पाठोपाठ आंत आली.

" एकट्याच असाल असं वाटलं म्हणून सहज डोकावून पाहिलं.–राग नाहीं ना आला ?" सर्वोत्तमराव बैठकीवर बसत म्हणाले.

" इश्श ! त्यांत राग कसला ? उलट तुमच्यासारख्या मोठ्या माणसांनीं असं वारंवार येऊन आम्हांला उत्तेजन दिलं तर आमचं कल्याणच आहे त्यांत. लोकांना यायलाच नको असतं. आम्हीं मुद्दाम बोलवावं तेव्हां कुठं त्यांना यावसं वाटतं–" किशोरी त्यांच्यापासून दूर अंतरावरच्या बैठकीवर खुरमांड्या घालून बसली.

" आलों होतों या बाजूला. दोन दिवस तुमच्या इथचा पाहुणचार घेतला पण तुमच्या आवाजाची फिरत ऐकण्याची फार आतुरता होती. म्हटलं तुम्ही एकट्या सांपडला म्हणजे ऐकायला मिळेल एकादी चीज–" सर्वोत्तमराव सिगारेटला काडी लावीत निष्काळजीपणाच्या सुरांत म्हणाले. किशोरी गोंधळली होती.

" छे: बाई ! कामाच्या रगाड्यामुळें माझं डोकं कोंग कलकलून गेलं

आहे. पुन्हां केव्हां तरी दोन चार महिन्यांनीं असेच निवांतपणें आलांत म्हणजे— "

" म्हणजे दोन चार महिने आम्ही इकडे येऊं नये; असंच सुचववण्याचा तुमचा बेत दिसतो आहे–" सर्वोत्तमराव सिगारेटचा धूर आढ्याकडे सोडीत म्हणाले.

" छे: छे: ! तसं कुठं मी म्हणतें आहे ? गैरसमज होऊं देऊं नका–" किशोरी जास्त गोंधळून उद्गारली.

" हें पहा, किशोरीबाई, रागवूं नका. पण हा बुरखा आतां काढा की. तुम्हांला स्वतःला संगीत कितपत येतें आहे याची मला थोडीशी माहिती आहे म्हणून मी विश्वासानें बोलतों आहें. थांबा, मध्यें बोलूं नका. ऐकून घ्या माझं. मुक्ता नांवाची एक मुलगी तुमच्याकडे येत होती ?"

किशोरीनें आश्चर्यानें होकारार्थक मान हालवली. म्हणजे हा मनुष्य तिचा काका कीं काय ? विजेच्या वेगानें तिच्या मनाला हा संशय चाटून गेला.

" ती माझी पुतणी आहे. मी आमच्या थोरल्या बंधूंकडे कधींमधीं येत असें तेव्हां तिनें मला तुमच्या या खटाटोपाची सारी माहिती सांगितली आहे. ऐकून घ्या. खरा प्रकार हा असा आहे. तुम्हीं आणि तुमच्या बंधुराजांनीं हा धंदा चालवलेला आहे. तुम्हांला जें काय अर्धवट ज्ञान आहे त्या जोरावर तुम्ही लोकांची दिशाभूल करीत आहां. अध्यक्षाकडून पैसे काढण्याची तुमची युक्ति मी तेव्हांच ओळखली. बरं आहे. मी जातों. पण मी तुम्हाला काल पैसे कां दिले नाहींत हें नीट कळावें म्हणून परत आलों होतों. अच्छा !" सर्वोत्तमराव जागचे उठलेले पाहतांच किशोरीला सारें जग भोंवती फिरल्यासारखें झालें. आणि काय चाललें आहे हें समजण्याच्या आंतच तिचा तोल गेला व सर्वोत्तमरावांना तिला शुद्धीवर आणण्याचें हें नवीनच काम करावें लागलें---!

* * *

एक महिन्यानें त्या संगीत विद्यालयाची पाटी काढून टाकण्यांत आली. त्या जागीं 'धी बॉम्बे, फ्रेंच, इंडिया हेअर कटिंग सलून' ही पाटी दिमाखानें

मिरवीत होती. आणि आश्चर्याची गोष्ट ही, कीं सुमारें दोन महिन्यानंतर त्या दुकानासमोरून एक मोटार जात होती. मोटार त्या दुकानासमोर आल्यावर थांबली. मोटारींत एक श्रीमंत गृहस्थ स्वतः गाडी हाकण्याच्या ठिकाणीं बसला होता व त्याला बिलगून एक बाई त्याच्या शेजारींच बसली होती. मुंबईत हीं दृश्यें नेहमींचींच असतात म्हणून तिकडे कोणाचेंही लक्ष जात नाहीं. तो गृहस्थ त्या बाईच्या कानाशीं लागून म्हणाला, "मुक्तान तुझ्या विद्यालयाचें हेअर कटिंग सलून बनवून सोडलें अखेरीस—शिष्यात् इच्छेत् पराजयम्!"

"मुक्ता होती म्हणून तर आपला हा योग आला नाहींतर जन्मभर—नको ग बाई तो ताप" किशोरी अंगावर शहारे आल्यासारखें करून म्हणाली.

---